ई - पुस्तक : कृष्ण सखा माझा भाग-5

लेखन : श्रीपरमानंदस्वामी (श्री. अविनाश मोरेश्वर लिमये)

संपर्क : ०२२-२४३६ १५१४ | ९९६९८ ७६८५०.

ई - प्रकाशन : ई साहित्य प्रतिष्ठान



www.esahity.com
esahity@gmail.com
eleventh floor, eternity
eastern express highway
thane, 400604.

# समर्पण

सगुण प्रेमभक्तिचा आनंददायी मार्ग दाखविणाऱ्या
सद्गुरुनाथ श्रीअवधूतस्वामी यांच्या पवित्र चरणी
त्यांच्याच कृपेने लाभलेले हे भक्तिभावाचे सुमधूर फळ,
सप्रेम समर्पण.

- श्रीपरमानंदस्वामी



# पुस्तक परिचय

नारदऋषी आणि लक्ष्मी यांच्या संवादातून उलगडत जाणारे हे कृष्णाचे गोकुळापर्यंतचे जीवनचरित्र अतिशय बोधप्रद आहे. कृष्णचरित्र हे अनेक चमत्कारांनी भरलेले आहे, असेच नेहमी वर्णन केले जाते. परंतु, श्रीपरमानंदस्वामी यांनी लिहिलेले हे कृष्णचरित्र वाचताना, त्या प्रसंगांमधील तर्कसंगतता वाचकांना विचार करायला लावणारी आहे. ते वाचताना हे प्रसंग असेच घडले असणार असेच वाटते. उदाहरणार्थ,

कृष्ण सखा माझा - भाग एक मधील कृष्णाची बंदीशाळेतून मुक्तता, यमुनेला आलेला पूर, नंदराजाच्या कन्येला घेऊन वसुदेवाचे मथुरेला येणे इत्यादीमधील चमत्कारांपेक्षा त्यामधील तर्कसंगत विचार मनाला भावतात आणि बुद्धीलाही पटतात. तसेच 'चमत्कार' या विषयाबद्दल नारद व लक्ष्मी यांचा संवादही वाचकांना विचार करायला लावणारा आहे.

कृष्ण सखा माझा - भाग दोन मध्ये कृष्णाच्या बाललीला तसेच कृष्ण व पेंद्या यांच्यातील सख्यत्व श्रीपरमानंदस्वामी यांनी अतिशय सुंदरपणे रंगविले आहे. कृष्णचरित्रामध्ये 'गोपीवस्त्रहरण' या नावाने प्रचलित असलेल्या प्रसंगाचे (जो लोकांच्या दृष्टीने अजूनही कृष्णावरील टीकेचा एक विषय ठरलेला आहे) श्रीपरमानंदस्वामी यांनी केलेले वर्णन (गोपिकांचे लज्जारक्षण) वाचताना तेच त्या प्रसंगातील वास्तव आहे असेच जाणवते. तसेच बाजाराला जाणाऱ्या गवळणींची दह्या-दूधाची मडकी फोडण्याच्या प्रसंगातील वास्तविकताही जाणवते.

कृष्ण सखा माझा - भाग तीन मध्ये राधा-कृष्ण यांची प्रथम भेट, त्यांच्या भेटींमध्ये घडणारे प्रसंग व त्यांचे एकमेकांशी होणारे संवाद, त्यांच्या भेटींमधील अडचणी इत्यादींमधून राधा-कृष्ण यांच्यातील सर्व नात्यांच्या पलिकडे असलेले भक्तिभावाचे संबंध जाणवतात. तसेच गोवर्धन

पूजन आणि मुसळधार वृष्टीचे संकट यांमधून पुन्हा एकदा चमत्कारांपलिकडील वास्तविकताच लक्षात येते.

कृष्ण सखा माझा - भाग चार मधील राधा-कृष्ण यांच्यातील प्रेमभक्तिभावाचे संबंध वाचताना भक्तिमार्गाचे श्रेष्ठत्व मनावर ठसते. तसेच कालिया मर्दनाचाही प्रसंग अतिशय वाचनीय आहे.

कृष्ण सखा माझा - भाग पाच मध्ये अक्रूराचे आगमन, राधेचा कृष्णाला भावपूर्ण निरोप, कृष्णाचे मथुरेकडे प्रयाण, कृष्णरूप राधा, कृष्णजयंती सोहळा असे अतिशय भावपूर्ण प्रसंग वाचायला मिळतात.

'कृष्ण सखा माझा' या ग्रंथाचे मुखपृष्ठही अतिशय सुंदर असून, ते श्रीपरमानंदस्वामी यांच्या संकल्पनेतूनच साकार झालेले आहे. राधा व कृष्ण यांच्यातील सख्यत्व तर यातून जाणवतेच, पण त्याचबरोबर ते एकमेकांच्या अतिशय जवळ असूनसुद्धा ते एकमेकांकडे पहात नाहीत, तर कृष्ण स्वतः स्वतःतच रमलेला आहे आणि राधा कृष्णप्रेमात रमलेली आहे हे जाणवते. दोघांनीही हातात धरलेली एकच मुरली हे राधा-कृष्ण यांच्या ऐक्यत्वाचेच प्रतीक आहे. एकूणच भक्तिमार्गाबद्दल असलेले गैरसमज दूर करणारा हा ग्रंथ आहे.

'ई साहित्य प्रकाशन' यांनी हा सुंदर ग्रंथ पाच भागांमध्ये वाचकांपर्यंत पोहोचविण्याचे मान्य केले, याबद्दल त्यांना धन्यवाद!

सौ.प्रतिमा प्रविण आठवले

# भाग-५

## अनुक्रमणिका -





*****

# अक्रुराचे आगमन

''हे लक्ष्मी, अनयाचे प्रेम व राधेचा भक्तिभाव याचा आनंद पुरेपूर अनुभवूनही कृष्णाची अंतर्मुखता कमी न होता अधिकच वाढलेली होती. अनय व राधा यांची त्यांच्या त्यांच्या परीने असलेली अवस्था पाहून कृष्णाला समाधान वाटले. राधेच्या भावाने कृष्ण संतुष्ट, तृप्त झाला होता, तर अनयाच्या ठिकाणी निर्माण झालेले प्रेम पाहून त्याच्या ठिकाणची अनयाविषयीची काळजीही आता दूर झाली होती. राधेच्या भक्तिभावाला साकार करणारे सूर आपल्या मुरलीतून स्फुरले याचा विशेष आनंद कृष्णाला झाला होता. त्या सुरांच्या माध्यमातून अनुभवलेले राधेच्या भक्तिभावाचे ऐक्य कृष्ण अजूनही अनुभवीतच होता. तो शब्दातीत अनुभव खरे तर त्याच्या अंतःकरणाचा स्थायीभावच झाला होता. ती जाणीव राधेच्या भक्तिभावाच्या आनंदात त्याला सदैवच ठेवणार होती. मग राधा बाह्यांगाने प्रत्यक्ष त्याच्या बरोबर असेल किंवा नसेल. तशी ती नसणार हे कृष्ण मनातून जाणून होता. परंतु तिच्या भक्तिभावाने राधा कृष्णाच्या अंतःकरणात नित्य राहणार होती आणि त्याची भेट तेथे नित्य घेणारच होती. त्यापासून कृष्णही तिला थांबवू शकला नसता आणि त्या ऐक्यापासून कृष्ण वेगळाही राहू शकला नसता. कृष्णाच्या अंतःकरणात पूर्णपणे ऐक्य पावलेली राधा, तिच्या भावाने कृष्णाच्या अंतःकरणात नित्य स्फुरत राहणारच होती. ऐक्यभावातील हे द्वैत कृष्णाच्या अंतःकरणात नित्य खेळतच राहणार होते आणि कृष्णाला सदा सर्वकाळ उत्साहित, कार्यरत व आनंदित ठेवणार होते. अशा तऱ्हेने आपल्या अंतःकरणातील ऐक्य व द्वैत यांच्या अद्‌भूत खेळाच्या आनंदात पूर्णपणे रमलेला कृष्ण आपल्या घरी केव्हा व कसा परत आला हे त्यालाही कळले नाही. पण कृष्ण घरी आला मात्र, नंदाने त्याच्यासाठी ठेवलेला निरोप कृष्णाला लागलीच मिळाला आणि तो ताबडतोब नंदाच्या भेटीसाठी गेला.

नंदाच्या पायांना हस्तस्पर्श करून त्याला अभिवादन करणाऱ्या कृष्णाला नंदाने प्रेमाने आपल्या जवळ घेतले आणि त्याचे मुख कुरवाळले. त्याचवेळी नंदाने त्याच्या शेजारीच बसलेल्या एका व्यक्तीकडे कृष्णाला खुणेने निर्देश केला. कृष्णाने त्या थोड्याशा वयोवृद्ध, पण भरदार व्यक्तिमत्त्वाच्या व्यक्तीकडे पाहिले मात्र, ती व्यक्ति स्वतःहून उठून पुढे आली आणि तिने वाकून कृष्णाच्या चरणांना वंदन केले. काय होते आहे हे कळायच्या आतच त्या व्यक्तिने अशी कृती केल्यामुळे कृष्णही थोडासा भांबावला आणि दोन पावले मागे सरला. कृष्ण काही बोलणार तोच त्या व्यक्तिनेच आपणहून बोलण्यास सुरुवात केली.

''हे कृष्णा, तू मला ओळखत नाहीस. परंतु मी मात्र तुला पाहताक्षणीच ओळखले. माझी ओळख तुला करून द्यायची तर फक्त दोन वाक्यातच करून देता येईल. एक म्हणजे मी या नंदराजाचा परम मित्र अक्रूर आहे आणि दुसरे म्हणजे मी मथुरेला कंसाच्या दरबारात चाकरीला आहे. म्हटले तर, या दोन परस्पर विरोधी गोष्टी दिसतील. परंतु त्या दोन्ही खऱ्या आहेत. त्यातील कंसाची चाकरी मला नशिबाने करावी लागत आहे. पण या नंदाची मैत्री मला मोठ्या भाग्यानेच लाभलेली

आहे. मथुरेत जेव्हा जेव्हा नंद काही कामासाठी येत असे, तेव्हा काही कामाच्या निमित्ताने आमची ओळख झाली. नंदाची सरलता, सज्जनता, वागण्या-बोलण्यातील साधेपणा या गुणांनी मी नंदाकडे आकृष्ट झालो आणि आमचा परिचय वाढतच राहिला. कामा व्यतिरिक्तही आमचे पुष्कळ भेटणे व बोलणे होऊ लागले आणि आमचा स्नेह जुळता जुळता अगदी दृढ होऊन राहिला. पुढे पुढे तर कामानिमित्त आलेला हा नंदराज माझ्या घरीच विश्रांतीसाठी थांबत असे आणि मग कितीतरी वेळ आमचा सहवास व बोलणे होत असे. असे हे आमचे अतूट मैत्रीचे नाते निर्माण झाले.

आता माझे इकडे कधी येणे का झाले नाही असा प्रश्न तुला पडणे साहजिकच आहे. त्याचे उत्तर एकच, की कंसाच्या भीतीनेच मी येथे येऊ शकत नाही. नंदाशी व या गोकुळाशी मथुरेच्या लोकांनी आणि त्यातूनही विशेषतः कंसाच्या दरबारातील व्यक्तिंनी कोणताही संबंध ठेवू नये अशी कंसाची सक्त ताकीदच आहे. खरे तर, पूर्वी कंसाचे संबंध गोकुळाशी अगदी चांगले होते. गोकुळातून मथुरेच्या बाजारात येणारे दूध दुभते अतिशय प्रसिद्ध होते. मथुरेच्या बाजारात व नगरीत गोकुळवासीयांची नेहमीच गर्दी असे. नंदाकडून गोकुळातर्फे मिळणारा महसूल सुद्धा कंसाला भरपूर, विनातक्रार व अगदी वेळच्या वेळी मिळत असे. त्यामुळे कंस नंदावर व गोकुळावर अतिशय खूश असे.

पण कंसाच्या या वृत्तीत अचानक बदल झाला. त्याला कारण असे झाले, की कंसाने स्वतःच्या सख्ख्या बहिणीला म्हणजे देवकीला आणि तिच्या पतीला म्हणजे वसुदेवाला अन्यायाने तुरुंगात टाकले. वसुदेव व देवकी यांचा आठवा पुत्र कंसाचा वध करणार आहे अशा कल्पनेने व भीतीने कंसाने त्यांच्यावर अनन्वित अत्याचार केले. त्यांच्या नवजात सात अर्भकांचा जन्मताच वध केला. आठव्या खेपेस जन्मतःच मृतवत असलेली मुलगी जन्माला आली. कंसाचा त्यावर मुळीच विश्वास बसला नाही. त्याच्या मनातील संशय कायमच राहिला. वसुदेव व देवकीचा आठवा पुत्र नक्कीच कुठेतरी सुखरूप जिवंत असून तो वाढत आहे, ही कंसाच्या मनातील शंका बळावत चालली. कंसाने त्या मुलाचा सर्वत्र शोध घेण्याचे प्रयत्न चालूच ठेवले. परंतु काहीच पत्ता लागेना. पण कृष्णा, हळुहळू जेव्हा तुझ्या अनेक पराक्रमाच्या बातम्या कंसाच्या कानावर येऊ लागल्या, तेव्हा मात्र कंसाची झोप उडाली. तुझ्याविषयीच त्याच्या मनात शंका येऊ लागली. त्यातून पुढे गोकुळातून मथुरेच्या बाजारात येणारे दूध दुभते कमी होता होता पूर्णपणे थांबले. मग तर कंसाचा गोकुळावरचा राग अगदी टोकाला गेला आणि त्याने आम्हाला गोकुळाशी कोणत्याही प्रकारचा संबंध वा संपर्क ठेवण्यास बंदीच केली.

हे कृष्णा, गोकुळातील तुझ्याविषयीचा कथा व प्रसंग ऐकून मी मात्र तुझ्या प्रेमात केव्हापासूनच पडलेलो आहे. तुझे रूप, गुण, तुझा पराक्रम आणि विशेषतः तुझे सर्वांवर असलेले प्रेम यांची मथुरेत सदैव चर्चा चालू असते. तुला प्रत्यक्ष न पाहताही केवळ तुझ्याविषयीच्या श्रवणानेच मथुरेतील अनेकांना वेडच लागलेले आहे आणि मीही त्यांच्यापैकीच एक आहे. कृष्णा, तुझ्या विशेष पराक्रमाच्या कथा ऐकल्या आणि माझी तर खात्रीच झाली की तू तर साक्षात ईश्वराचा अवतार आहेस. अरे, मुसळधार जलवृष्टीत गोवर्धनाच्या आश्रयाला नेऊन सतत सात दिवस तू जे गोकुळवासीयांचे रक्षण केलेस आणि विषारी कालियाचे मर्दन करून तू जे अनयाचे प्राण वाचवलेस, या गोष्टीवरून हेच सिद्ध होते की तू सामान्य मानव नाहीच

आहेस.  म्हणूनच तर तुला पाहताक्षणीच मी तुला वंदन केले.  या आधीही कंसाने अनेक राक्षस संशयावरून तुझ्या नाशाकरता या गोकुळावर पाठवले होते.  परंतु त्यातील एकही जिवंतपणे परत आलाच नाही.  मथुरेत कंसासह आम्हा सर्वांनाच याचे नवल वाटले.  परंतु त्या सर्वांचा तूच पराक्रमाने वध केला होतास हे आम्हाला नंतर का होईना, पण कळलेच. त्यामुळेच तर कंसाच्या ठिकाणी तुझ्याविषयीचा द्वेष, मत्सर वाढत राहिला.  आत्यंतिक रागाने व भीतीने कंसाला सारखा तुझाच ध्यास लागून राहिला आहे.  सारखा तुझा विषय काढल्याशिवाय त्याला तर चैनच पडत नाही.

परंतु माझ्या ठिकाणी मात्र तुझ्या दर्शनाचा ध्यास हा तुझ्याविषयीच्या आत्यंतिक प्रेमाने आणि तुझे माहात्म्य लक्षात आल्यामुळे लागलेला आहे.  तुझ्या ठिकाणी सर्वांविषयीचा असलेला आपलेपणा व जिव्हाळा ही साधी गोष्टच नाही.  तुझ्या प्रेमाने तू सर्वांना सुखवतोस, त्यांची मने आकर्षून घेतोस आणि त्यांना कल्याणाचा सन्मार्ग दाखवतोस यातच तुझी सर्व थोरवी सामावलेली आहे.  या तुझ्या प्रेमाचा तू स्त्रियांनाही लाभ करून दिलास म्हणून गोकुळात तुझ्यावर झालेली टीका व निंदाही माझ्या कानावर आलेली आहे.  पण मी मात्र तिकडे पूर्ण दुर्लक्षच केले.  कारण सामान्यजन खऱ्या प्रेमाचा अर्थ जाणतच नाहीत.  प्रेम म्हणजे सुख, स्वार्थ व वासना एवढेच ज्यांना दिसते तो त्यांचा दोष आहे.  तुझा याच्यात काहीच दोष असणे शक्य नाही.

कृष्णा, तुझ्या व राधेच्या प्रेमसंबंधाच्याही अनेक कथा मथुरेतही माझ्या कानावर आल्या आहेत.  स्त्री असूनही ज्या राधेने तुझे खरे प्रेम ओळखले आणि तिच्या ठिकाणी तुझ्याविषयीचा आत्यंतिक भक्तिभाव निर्माण झाला, त्या राधेला भेटण्यास तर मी अत्यंत आतुरच आहे.  राधा व कृष्ण यांची जोडी पाहीन तेव्हाच माझे नेत्र शांत होतील आणि माझे मन तृप्त होईल.  कृष्णा, सर्वांत महत्त्वाचे म्हणजे ज्या तुझ्या मुरलीवादनाने तू सर्वांची मने आकर्षून घेऊन जिंकलीस, ते तुझे मुरलीवादनही मला मनसोक्त श्रवण करायचे आहे.  त्या मुरलीच्या नादाची धुंदी मला अनुभवायची आहे.''

अशा तऱ्हेने भावपूर्ण होऊन अक्रूर किती तरी वेळ बोलतच होता.  बोलता बोलता प्रेमाने कंठ दाटून आल्यामुळे त्याच्या मुखातून तर पुढे शब्दच फुटेना.  तशाच गहिवरलेल्या अवस्थेत अक्रूर पुन्हा कृष्णाच्या जवळ येऊन त्याच्या चरणांना वंदन करू लागला असता, कृष्णाने त्याला उठवले आणि प्रेमाने दृढ आलिंगन दिले.

अक्रूराचे भावपूर्ण बोलणे ऐकून नंद मात्र एकदम गंभीर झाला.  कृष्णजन्माचे रहस्य जाणून असलेला नंद थोडा वेळ स्तब्धच राहिला.  तेवढ्यातच यशोदा स्वतः सर्वांसाठी फराळाचे पदार्थ व थंड पेय प्राशनासाठी घेऊन आली.  तिच्या बरोबर बलरामही तेथे आला.  यशोदा स्वतः सर्वांना आग्रह करून फराळाचे नानाविध पदार्थ देत होती.  परंतु त्याचे सेवन करण्यासाठी कोणाचेच मन नीटपणे लागत नव्हते.  सर्वांचा हा निरुत्साह यशोदेच्याही लक्षात आला आणि तिलाही त्याचे नवलच वाटले.  शेवटी न राहवून नंदाने शांततेचा भंग केला आणि अक्रूराशी बोलावयास प्रारंभ केला.

''मित्रा अक्रूरा, आपल्या मैत्रीसंबंधी तू सांगितलेला शब्द अन् शब्द खरा आहे. तुझ्या सारखा सच्चा मित्र मला भेटला हे माझेही भाग्यच आहे. कंसाच्या भीतीमुळे तुझी व माझी भेट होऊ शकली नाही हे मी समजू शकतो. परंतु कंसाच्या ठिकाणी कृष्णाविषयी वृथा शंका का असावी हे मात्र मला समजू शकत नाही. दुसरा महत्त्वाचा मुद्दा म्हणजे, जर तुला माझी भेट घेण्यासाठी कंसाची बंदी आहे, तर मग आज तू इकडे कसा काय आलास? का कंसाच्या नकळतच आला आहेस? पण तसे असेल तर मला तुझी अधिकच काळजी वाटते. कारण अशी जोखीम पत्करण्यात तर तुझ्या जिवालाच धोका आहे. कंसाला जर कळले तर तो तुझी मुळीच गय करणार नाही आणि तुला जिवंतही सोडणार नाही.''

नंदाच्या बोलण्यावर अक्रूर थोडा वेळ काही न बोलता स्वस्थच बसला. त्याच्या स्वस्थ बसण्यामुळे नंद मात्र थोडासा अस्वस्थच झाला. काही काळ तसाच निःशब्द अवस्थेत गेल्यानंतर अक्रूर शांत सुरात एकेक शब्द हळुहळू बोलू लागला.

''मित्रा नंदा, मला स्पष्ट बोलल्याबद्दल क्षमा कर. पण कंसाच्या मनात या विषयी आता शंका राहिली नसून त्याची तशी पक्की खात्रीच झालेली आहे. कारण प्रत्यक्ष नारद ऋषींच्या मुखातूनच कंसाने हे सत्य ऐकलेले आहे. नारद ऋषींनी कंसाला अगदी निःसंदिग्ध शब्दात सांगितले की 'वसुदेव व देवकी यांचा आठवा पुत्र कृष्णाच्या रूपाने गोकुळात सुखरूपपणे वाढतो आहे आणि त्याच्याच हातून तुझा मृत्यू होणार आहे हेही अटळच आहे.' तेव्हापासून कंस जो बेचैन झाला आहे, तो....''

पण यापुढे काही अक्रूर बोलण्याच्या आतच यशोदा मोठ्या आवाजात जवळ जवळ एकदम ओरडूनच म्हणाली, ''ते शक्यच नाही. कृष्ण हा माझाच मुलगा आहे. दुसऱ्या कोणाचाही तो मुलगा असणे कदापिही शक्य नाही. प्रत्यक्ष मी कृष्णाला प्रसवलेले असताना त्याला दुसऱ्या कुणाचा मुलगा म्हणणेच काय, पण तशी कल्पनाही करणे अत्यंत चुकीचे आहे. हे शब्द माझ्या केवळ कानावर पडल्यावरतीच माझ्या मनाला असंख्य सुया टोचल्यासारख्या वेदना होऊ लागल्या आहेत.

त्या नारद ऋषींचे म्हणायला काय जाते? नक्की त्यात त्यांचा काहीतरी डाव असला पाहिजे. कंसाला उगाचच चिथवून कृष्णाच्या अंगावर सोडण्यात त्या नारदांचा काय हेतू असावा हे माझ्यातरी लक्षात येत नाही. पण तो हेतू चांगला नाही एवढे मात्र निश्चित. नारद त्या कंसाची चेष्टा मस्करी तर करीत नव्हते ना? पण त्यामुळे जिवावर बेतणार आहे ते कृष्णाच्या, एवढेही त्यांच्या लक्षात कसे आले नाही? बरे, कृष्णाचे वय ते काय? तो किती लहान आणि त्या कंसाचे वय काय? तो किती मोठा आहे. मग या लहान कृष्णाच्या हातून त्या एवढ्या मोठ्या कंसाचा मृत्यू होणे केव्हातरी शक्य आहे का? उगाचच असे गंमत म्हणून काही तरी खोटे कंसाला सांगणे हे नारदांसारख्या थोर ऋषींना तरी अजिबात शोभत नाही.

त्या कंसालाही लगेचच ते खरे वाटले आहे आणि तो आता बिचाऱ्या कृष्णाच्या जिवाच्या मागे लागणार. दुसऱ्याच्या प्राणांवर संकट ओढवेल अशी काही तरी गंमत करणे हे चूकच आहे, एवढे तरी त्या नारदांना समजायला नको?

स्वतःला मोठे ऋषी म्हणवून घेतात आणि एवढी साधी गोष्ट त्यांच्या लक्षात येत नाही म्हणजे काय? नंद महाराज, तुम्ही तुमच्या मित्राला सर्व काही नीट समजावून सांगा ना. मला वाटते त्यापेक्षा तुम्ही स्वतः मथुरेला जाऊन कंस महाराजांना योग्य तो खुलासा करा आणि त्यांचे सर्व गैरसमज दूर करा. तोपर्यंत माझ्या मनाला लागलेला हा घोर नाहीसा होणार नाही आणि मला मुळीच स्वस्थता लाभणार नाही. पण तुम्ही असे स्वस्थ का?''

मोठ्या आवाजात आणि भराभर बोलल्यामुळे यशोदेच्या घशाला शोषच पडला आणि तिच्या तोंडातून शब्दच फुटेनासा झाला. तेव्हा तिच्या डोळ्यातून घळाघळा अश्रू वाहू लागले आणि ती स्फुंदून स्फुंदून रडू लागली. यशोदेची ती कारूण्यपूर्ण अवस्था पाहून कृष्ण व बलराम दोघेही धावतच तिच्याजवळ गेले आणि दोन्ही बाजूंनी तिला बिलगून बसले. कृष्णाने स्वतः आपल्या हातांनी यशोदेचे डोळे पुसून तिचे सांत्वन केले. कृष्णाचेही नेत्र अश्रूंनी डबडबलेच होते. कृष्णाला तशा अवस्थेत पाहून यशोदेने त्याला आपल्या कुशीत घेतले आणि ती त्याच्या गालाचे व कपाळाचे पटापट मुके घेऊ लागली. यशोदेकडे पाहून अक्रूरालाही गलबलून आले आणि तो प्रश्नार्थक मुद्रेने नंदाकडे नुसता पहात राहिला. परंतु नंद मात्र खाली मान घालून स्वस्थच बसला होता. त्याच्या डोळ्यातही अश्रू तरळले होते आणि त्याचा चेहरा मात्र अत्यंत गंभीर झाला होता. नंदाची ती न बोलण्याची अवस्था पाहून कृष्ण यशोदेच्या मांडीवरून उठला आणि नंदाच्या जवळ आला. नंदानेही प्रेमाने कृष्णाला जवळ घेतले आणि त्याचे मस्तक आपल्या हाताने कुरवाळीत राहिला.

कृष्णजन्माचे रहस्य माहीत असलेल्या नंदालाही जास्त वेळ न बोलता स्वस्थ बसून राहणे अशक्य होऊ लागले. शेवटी नंदाने मनाचा हिय्या केला आणि सर्व बळ एकवटून बोलण्यास सुरुवात केली.

''हे यशोदे, हे कृष्णा, तुम्ही सर्वांनी मी आता जे काही सांगत आहे त्याकडे नीट लक्ष द्या आणि माझे सांगणे काळजीपूर्वक ऐका. कंसाला जी कृष्णाविषयी शंका आली आहे आणि जे त्याला नारद ऋषींनी सांगितले आहे ते सर्व खरेच आहे. नारद ऋषींचे सांगणे हे सत्यच असणार. उगाच काहीतरी बोलणे हा त्यांचा स्वभाव असणे शक्यच नाही आणि तो त्यांचा धर्मही नाही. कारण या सर्व गोष्टींमध्ये मी केवळ साक्षी नाही, तर प्रत्यक्ष सहभागीही झालेलो आहे. कृष्ण हा वसुदेव व देवकी यांचाच आठवा पुत्र आहे ही गोष्ट पूर्ण सत्य आहे.

कृष्णाचा जन्म झाल्यावर कंसाच्या भीतीने वसुदेवाने मोठ्या मुश्किलीने भर रात्री सर्वांच्या नकळत आणि मुसळधार पावसात कृष्णाला या गोकुळात आणले. वसुदेवाचा त्याला रोहिणीपासून झालेला पुत्र बलराम हा आधीच, म्हणजे वसुदेव व देवकीला कंसाने बंदीवासात टाकल्यावरती माझ्याकडे येऊन राहिलेला होता. माझा अत्यंत जिवलग मित्र असलेल्या वसुदेवाने माझ्यावरच्या भरवशाने त्याला माझ्या स्वाधीन केले. मी सुद्धा मित्रप्रेमाने मित्रकर्तव्याला जागलो आणि कृष्णाचा प्रेमाने स्वीकार केला. योगायोगाने त्याच वेळेस यशोदाही प्रसूत पावलेली होती आणि दुर्दैवाने तिने एका मृत बालिकेला जन्म दिला होता. घडणाऱ्या प्रसंगामध्ये मला काहीतरी ईश्वराची नियती व संकेत जाणवू लागले. मृत बालिकेला जन्म दिल्याचे दुःखही यशोदेला सहन करताना फारच मानसिक क्लेश सहन करावे लागले असते आणि ते तिला अत्यंत कठीणच होणार

होते. वसुदेवाच्या मुलाचे गोकुळातील अस्तित्वही सर्वांपासून लपवून ठेवायचे होते. अशा परिस्थितीत मी मनामध्ये ईश्वराचे स्मरण करून त्याचीच प्रार्थना केली आणि त्यातून मला मिळालेल्या प्रेरणेनुसार त्या मृत बालिकेला वसुदेवाच्या स्वाधीन केले. वसुदेवाच्या मुलाला म्हणजे आमच्या या कृष्णाला हळूच मी यशोदेच्या जवळ तिच्या कुशीत ठेवले. सुदैवाने यशोदा त्यावेळेस ग्लानीत होती आणि आजूबाजूलाही कोणी नव्हते.

ज्या सुईणीने यशोदेची प्रसूती केली होती तिलाही सर्व परिस्थितीची कल्पना मी दिली. तिनेही यशोदेच्या मनाची भावनात्मकता जाणून असल्यामुळे मला सहाय्य केले. याची कोठेही वाच्यता न करण्याचे तिने मला नुसतेच आश्वासन दिले असे नाही, तर ती तेव्हापासून जी गोकुळ सोडून गेली ती परागंदाच झाली. तिला माहीत असलेले रहस्य कोणालातरी सांगण्याचा जरासुद्धा मोह होऊ नये म्हणूनच त्या सुईणीने बहुधा हा निर्णय आपणहूनच घेतला असावा.

हे यशोदे, तुझ्यापासून हे सर्व लपवण्याचा माझा मुळीच हेतू नव्हता. परंतु तुला खरे सांगण्याचे अनेकदा मनात येऊनही मला तसे प्रत्यक्ष धैर्य कधीच होत नसे. कृष्णाच्या नामकरण प्रसंगाच्या वेळी महर्षी गर्ग मुनींचे आगमन झाले होते. त्यांना मी सर्व हकिगत सांगून माझे मन मोकळे केले होते. सर्वज्ञ असलेल्या गर्ग मुनींनी त्यावेळेस मला धीर दिला आणि मनोबळही दिले. कृष्णजन्माचे हे रहस्य कोणालाही न सांगण्याविषयी त्यांनीच मला निक्षून सांगितले. सर्व गोष्टी योग्य वेळी प्रगट होतील असे त्यांनी मला सांगितले. गर्ग मुनींचा शब्द प्रमाण मानून मी या गोष्टी कोणाकडेही कधीही प्रगट केल्या नाहीत.

पुढे, कृष्णाचे मनोहारी रूप, मनाला भुलविणाऱ्या त्याच्या नानाविध बाललीला आणि त्याच्याकडून प्रगटणारे एकेक गुणविशेष पहाता पहाता माझ्या मनावरील ताणही हळुहळू कमी होत चालला. कृष्णाचे अस्तित्वच मला एवढा आनंदाचा अनुभव देऊ लागले की त्यापुढे मी सर्व विसरूनच गेलो. परंतु जेव्हा जेव्हा कृष्णाकडून काही विशेष वागणे व बोलणे घडत असे किंवा काही विशेष पराक्रम कृष्णाकडून प्रगट होत असे, तेव्हा मात्र मला गर्गमुनींच्या वचनाची प्रकर्षाने आठवण होत असे. कृष्णाचे माहात्म्य जाणवून माझे अंतःकरणही भरून येत असे. परंतु ते मी बाह्यांगाने कधीही प्रगट केले नाही. 'कृष्णाने गोकुळ सोडून जाण्याचा प्रसंग कधीतरी येणारच आहे. कृष्ण काही कायमचा गोकुळात राहणे शक्य नाही' याची पूर्ण जाणीव माझ्या अंतःकरणात कुठेतरी खोलवर होतीच. फक्त तो विचारही माझ्या मनाला असह्य होत असल्यामुळे मी तसा विचार करणेही टाळतच असे. परंतु परमेश्वराच्या नियतीनुसार सर्व गोष्टी आता प्रगट झालेल्या आहेत आणि त्या परमेश्वराच्या इच्छेनुसारच पुढील सर्व गोष्टी घडतील अशी माझी श्रद्धा आहे. कृष्ण स्वतः योग्य ते सर्व निर्णय घेऊन त्या प्रमाणे वागण्यास समर्थ आहे अशी माझी खात्री आहे.''



बराच वेळ मोकळेपणाने बोलत असलेला नंद बोलायचा थांबला तेव्हा जरी त्याचे मन पूर्ण मोकळे झाले होते, तरी आता पुढे काय व कसे होणार या विषयीचा त्याच्या मनातील ताण कायमच होता. एवढेच नव्हे तर तो ताण आता तेथील सर्वांच्याच मनाला आला होता. कोणीच काही बोलत नव्हते. यशोदा तर आपले तोंड दोन्ही हातात झाकून घेऊन स्फुंदून स्फुंदून रडत होती. बलरामाच्याही डोळ्यातून अश्रू ओघळत होते. अक्रूर भावपूर्ण होऊन एकदम स्तब्ध झाला होता. पण कृष्ण खोल विचारात गढून जाऊन एकदम गंभीरच झाला होता.

शेवटी यशोदेनेच न राहवून रडत रडतच कृष्णाला विचारले, ''अरे कृष्णा, माझ्या कान्हा, नंद महाराजांचे हे सर्व बोलणे तुला तरी खरे वाटते का रे? असे काही घडणे शक्य तरी आहे का? माझा तरी यावर मुळीच विश्वास बसत नाही. कृष्णा, तू माझा मुलगा नाहीस व मी तुझी आई नाही असे कधीतरी होऊ शकेल का? माझ्याशिवाय तुझी दुसरी कुणीही आई नाही आणि तुझ्याशिवाय माझा दुसरा कुणीही मुलगा नाही हेच एक खरे आहे. बाकी दुसरे मी काही जाणत नाही. पण कृष्णा, मला फक्त हे एकदा तुझ्या मुखातून ऐकायचे आहे. तू मला सांगितलेस ना की 'मी तुझीच आई आहे आणि तू माझाच मुलगा आहेस' मग बाकी कोण काय म्हणते याची मला मुळीच पर्वा नाही. कृष्णा, अरे कान्हा, सांग ना? मी जे म्हणते तेच खरे आहे ना? होय ना? सांग ना, सांग ना''

असे वारंवार म्हणत यशोदा पुन्हा धाय मोकलून रडायला लागली. त्या रडण्याचा शरीराला व मनाला होणारा ताण असह्य होऊन यशोदेला भोवळच आल्यासारखे झाले. कृष्णाने पुढे धावून तिला सावरले. बलरामाने धावत जाऊन पाणी आणले. कृष्णाने आपल्या हाताने ते पाणी यशोदेच्या मस्तकावर थोडे थोडे पुन्हा पुन्हा शिंपडले. थोडे पाणी यशोदेच्या डोळ्यांनाही लावले. थोड्या वेळाने यशोदा सावध झाली. समोर कृष्णाला पाहताच तिला बरे वाटले आणि कृष्णाकडे पाहून तिने मंद स्मित केले. कृष्णानेही तिच्याकडे पाहून किंचित हसल्यासारखे केले आणि अश्रूंनी नेत्र डबडबलेल्या कृष्णाच्या मुखातून अस्पष्ट असे दोनच शब्द उमटले, ''आई, माझी आणि फक्त माझीच आई.'' यशोदेने ते शब्द ऐकले मात्र, सर्व देहभान हरवून ती कृष्णाच्या मिठीतच शिरली. कृष्णाच्या खांद्यावर आपले डोके टेकून ठेवलेल्या यशोदेच्या मुखातून 'माझा कृष्ण, माझा कान्हा' एवढेच शब्द जेमतेम बाहेर येऊ शकले.

*****

# कृष्णाची सत्यभूमिका

**य**शोदेच्या भावनात्मक अवस्थेची पराकोटी गाठणाऱ्या प्रसंगामुळे सर्व वातावरणच अत्यंत भावपूर्ण झाले आणि सर्वांचीच मने भारावून राहिली. तशा त्या निःशब्द व नीरव शांततेत बराच काळ गेल्यावर कृष्णानेच यशोदेच्या भावनांच्या उद्रेकाला आवर घातला आणि स्वतःला यशोदेपासून अलगदपणे दूर केले. अजूनही मुसमुसून रडणारी यशोदा हळुहळू शांत होत राहिली. यशोदा आता बरीचशी सावरली आहे हे पाहून कृष्णाने तिच्याशी मृदू व हळुवार आवाजात बोलावयास सुरुवात केली.

''हे यशोदामाई, आता मी काय सांगतो ते शांतपणे ऐक आणि नीटपणे समजून घे. नारदऋषी, गर्गमुनी यांच्यासारखे थोर पुरुष कधीही असत्य वचने बोलणार नाहीत. तेव्हा त्यांच्या सांगण्यावरती आपल्याला श्रद्धा ही ठेवावयासच हवी. कारण त्यांचे सांगणे हे निरपेक्ष असते. त्यामध्ये असत्याला वाव देणारा असा जो स्वार्थ, तो असणे कदापिही शक्य नाही. या थोर पुरुषांची अंतःकरणे ईश्वरी प्रेमाने भरलेली असल्यामुळे अत्यंत शुद्ध असतात. तेथे कोणताही विकल्प किंवा विकार संभवतच नाही. तेथे ईश्वराच्या नियतीतील सत्य संकल्पच केवळ स्फुरत असतात. म्हणूनच त्यांचे बोलणे हे त्रिवार सत्य असते आणि तेच आपल्याला प्रमाणभूत असावयास हवे. तेव्हा वसुदेव व देवकी हीच माझी जन्म देणारी पिता व माता आहेत आणि मी त्यांच्याच पोटी जन्माला आलेलो आहे हे पूर्ण खरेच असणार. या गोष्टीचा आपण मनापासून स्वीकार करावयासच हवा. त्याला दुसरा काहीही पर्याय असूच शकत नाही.

हे यशोदामाई, परंतु मी एक अत्यंत महत्त्वाची अशी जी गोष्ट तुला सांगत आहे, ती पूर्णपणे ध्यानात घे आणि सदैव लक्षात ठेव. माता व पिता म्हणून माझे संबंध फक्त तुझ्याशी व नंदमहाराजांशीच आहेत हे सत्य आहे आणि त्यात कधीही व कशानेही बदल होणे शक्यच नाही. नात्याने वसुदेव व देवकी माझे पिता व माता आणि मी त्यांचा मुलगा असेनही, परंतु संबंधानुसार मी केवळ तुमचाच मुलगा आहे आणि तुम्हीच फक्त माझे माता-पिता आहात. अगं माई, जिच्या स्तनपानावर मी लहानाचा मोठा झालो, जिने मला अन्नचा पहिला घास भरवला, जिने मला बोलायला, चालायला, लिहायला व वाचायला शिकवले, जिने मला खेळवले व जी माझ्याशीही खेळली, जिने माझे सर्व हट्टही पुरवले व वेळप्रसंगी मला थोडासा मार देऊनही मला शिस्त लावली, जिच्यासाठी मी जीव की प्राण आहे त्या माझ्या अत्यंत प्रिय यशोदामाईशिवाय माझी दुसरी कोणीही माता असणे शक्यच नाही. जन्मदात्या मातेपेक्षाही माझे जीवन घडवणाऱ्या मातेचा अधिकार माझ्यावर प्रथम व अधिक आहे हे निःसंशय. म्हणूनच हे माई, 'तू माझीच आई' व 'मी तुझाच मुलगा' या आपल्या माता व पुत्र संबंधांमध्ये केव्हाही, कधीही व कशानेही जराही किंतू येऊ न देता, आपले संबंध पुरेपूर अनुभवीत राहा.

हे नंदमहाराज, हे तात, यशोदामातेला जे मी सांगितले तोच भाव माझा तुमच्याविषयीचा आहे. जन्मदाते माता व पिता हे निमित्तमात्र आहेत. परंतु ज्यांनी माझे रक्षण व संगोपन केले, ज्यांनी मला वाढवण्यासाठी अपार कष्ट सहन केले,

ज्यांनी माझ्या मनावर सुसंस्कार केले, माझ्यावर आलेल्या अनेक कठीण प्रसंगात ज्यांनी मला धीर दिला आणि जे माझ्या पाठीशी सदैव उभे राहिले, ते माझे अत्यंत प्रिय नंद तात हेच माझे खऱ्या अर्थाने पिता आहेत याविषयी माझ्या मनात जराही शंका नाही. म्हणूनच हे तात, आपल्या असलेल्या पितापुत्रांच्या संबंधातील प्रेमाचा मोकळेपणा हाच खरा आहे आणि तो तसाच कायम राहणार आहे. आपले पिता व पुत्र म्हणून असलेले संबंधच खरे आहेत आणि ते नित्य तसेच राहतील.''

कृष्णाच्या भावपूर्ण व निश्चयात्मक बोलण्याने नंद व यशोदा यांचीही मने भरून आली आणि त्यांच्याही मुखावरती खात्रीचा भाव दिसू लागला. कृष्णाच्या शब्दाशब्दातून वाहणाऱ्या प्रेमाने नंद व यशोदा यांची मने पुन्हा ताजीतवानी व उत्साही झाली. त्यांच्या ठिकाणचा आत्मविश्वास पुन्हा जागृत झाला आणि त्यांना एकदम मोकळे मोकळे झाल्यासारखे वाटू लागले. अक्रूराच्या चेहऱ्यावरचेही काळजीचे भाव नाहीसे होऊन तेथे कृष्णाविषयीच्या प्रेमभावाने जागा घेतली. बलरामाच्याही दुःखाने म्लान झालेल्या चेहऱ्यावरती पुन्हा तजेला आला आणि तोही कृष्णाकडे अत्यंत कौतुकाने पहातच राहिला. अशा तऱ्हेने त्या ठिकाणी विश्वासाचे व खात्रीचे वातावरण निर्माण झालेले पाहून कृष्णालाही एकदम बरे वाटले खरे, परंतु त्याचे बोलणे अजून पुरे झालेले नव्हते. फक्त मध्ये थोडा वेळ थांबून त्याने सर्वांच्या अनुकूल मनःस्थितीचा अंदाज घेतला आणि तशी त्याची खात्री पटल्यावर कृष्ण पुढे बोलू लागला.

''हे तात, हे माई, आपल्या संबंधाची तुम्हाला खात्री पटली आणि तुमच्या ठिकाणी त्या विषयीचा विश्वास निर्माण झाला हे चांगलेच झाले. कारण हा विश्वास व ही खात्री हेच सर्व संबंधाचे मूळ आहे आणि त्यामुळेच कोणतेही संबंध हे यशस्वी व आनंदाचे होतात. या बळकट संबंधामुळेच ज्याला त्याला ज्याचे त्याचे कर्तव्यकर्म करण्याचे बळ येत असते. तेच बळ मला आता घ्यायचे आहे आणि आपल्या प्रेमसंबंधाच्या बळामुळेच ते बळ मला घेता येणे शक्य होणार आहे.

मगाशी मी तुम्हाला सांगितल्याप्रमाणे वसुदेव व देवकी ही माझी जन्मदात्री पिता व माता आहेत आणि केवळ माझ्यामुळेच त्यांना कंसाने बंदीवासात ठेवले हे खरेच आहे. गेली जवळ जवळ बारा वर्षे त्या उभयतांना अतोनात कष्टाचे व अनन्वित क्लेशाचे जीवन जगणे भाग पडले आहे. केवळ माझा जीव वाचवण्याच्या हेतूनेच त्यांनी मला त्यांच्यापासून दूर केले आणि मोठ्या विश्वासाने या गोकुळात तुमच्याकडे सुपूर्द केले. त्या वेळेस त्या उभयतांना आणि त्यातूनही विशेषतः देवकी मातेला किती मानसिक त्रास झाला असेल, याची कल्पना केवळ यशोदा मातेलाच करता येणे शक्य आहे. त्यांच्या ठिकाणी अजूनही केवळ एकच अंधुकसा आशेचा किरण उरलेला असेल, की 'आपला पुत्र केव्हातरी मथुरेला परत येईल आणि भविष्यवाणीनुसार कंसाचा वध करून आपली कारागृहातून सुटका करील.'

आपल्या पुत्राकडून अशी आशा व अपेक्षा करणे रास्तच आहे, नाही का? आणि मग तशाप्रकारे त्यांची सुटका करणे हे माझे आद्य व मुख्य कर्तव्यकर्म नाही का? मला अगदी पक्की खात्री आहे, की तुमच्या मनातही निश्चितपणे हेच विचार असतील आणि तुमचीही माझ्याकडून नक्की तीच अपेक्षा असेल. तेव्हा आता पुत्र या नात्याने वसुदेव व देवकी यांच्या संबंधातील माझे कर्तव्यकर्म पार पाडण्याची वेळ येऊन ठेपलेली आहे. अक्रूर काकांच्या रूपाने हा ईश्वराचा संकेतच जणू

मला आता मिळालेला आहे. तोच संकेत प्रमाण मानून मला आता मथुरेला जाऊन माझ्या जन्मदात्या मातापित्यांची कंसाच्या कारागृहातून लवकरात लवकर सुटका करणे अत्यंत आवश्यक व अतिशय महत्त्वाचे आहे. त्यामुळेच केवळ मी त्यांच्या ऋणातून काही अंशाने का होईना, पण मुक्त होईन. त्यासाठीच हे तात, हे माते, मला तुमच्या आशीर्वादाची व तुमच्या पूर्ण पाठिंब्याची अत्यंत जरुरी आहे. तुमचे आशीर्वाद माझ्या पाठीशी असल्यावरती मग मला कशाचीही भीती तर नाहीच, पण मी नक्की यशस्वी होणारच याची मला खात्री आहे.''

कृष्णाचे बोलणे जिवाचे अगदी कान करून ऐकत असलेले नंद व यशोदा कृष्णाकडे अगदी एकटक नजरेने पाहत होते. पाहता पाहता व ऐकता ऐकता जरी त्यांचे देहभान हरवल्यासारखे झाले होते, तरी मन मात्र भावपूर्ण झाले होते. कृष्णाविषयीच्या प्रेमाने व कौतुकाने त्या उभयतांचा उर अगदी भरून आला होता. कृष्णाचे बोलणेच एवढे प्रेमाचे, निःसंदिग्ध व निश्चयात्मक होते, की त्यामुळे नंद व यशोदा यांची मनेही प्रेमाने भरून आली आणि त्यांच्या बुद्धीलाही कृष्णाचे सांगणे तंतोतंत पटले. यशोदा साहजिकच थोडीशी भावनाविवश झालीच. कृष्ण एवढा लहान असताना त्याने मथुरेला जाऊन कंसाशी मुकाबला करणे हे तिला योग्य वाटत नव्हतेच. कृष्णावरील आत्यंतिक प्रेमामुळेच तिला हे वाटत होते हे खरे आहे. परंतु कृष्णाच्या बोलण्यातूनच त्याचा मथुरेला जाण्याचा निश्चय यशोदेला जाणवला. कोणत्याही परिस्थितीत कृष्ण त्याचाच निश्चय पूर्ण करणार याचीही यशोदेला पूर्ण खात्री होती. म्हणूनच महत्प्रयासने काहीही न बोलता यशोदा स्वस्थ बसून राहिली. पण मनातून ती थोडीशी कावरी बावरी झालेली होतीच.

नंदाचे अंतःकरण मात्र कृष्णाच्या प्रेमाने व कौतुकाने अगदी भरून आलेले होते. कृष्णाचे माहात्म्य थोडेफार का होईना जाणून असल्यामुळे, नंदाला कृष्णाची विचारसरणी, त्याच्या ठिकाणी असलेला वसुदेव-देवकीविषयीचा आपलेपणा, त्यांच्याविषयी असलेल्या कर्तव्याची जाणीव हे सर्व पाहून अतिशय आनंद झाला. नंदाला तर कृष्णाविषयी सार्थ अभिमानच वाटला. परंतु तरीही कृष्णाविषयीच्या स्नेहाने व काळजीने नंद बोलू लागला.

''अरे कृष्णा, तुझे सर्व बोलणे हे अत्यंत संयुक्तिक व समर्पक असेच आहे आणि तुझे प्रत्यक्ष वागणेही अगदी तसेच आहे. सर्वांविषयीचाच आपलेपणा व जिव्हाळा जेथे तुझ्याठायी आहे, तेथे मग प्रत्यक्ष तुझ्या जन्मदात्या मातापित्यांविषयी कसा बरे अपवाद संभवेल? कदापिही ते शक्यच नाही. तरीही कृष्णा, आम्हाला तुझी काळजी ही वाटतेच आणि तेही अगदी साहजिकच आहे, नाही का? वसुदेव व देवकी यांना कंसाच्या बंदीवासातून मुक्त करणे हे तर प्रथम व अत्यंत महत्त्वाचे कर्तव्यकर्म फक्त तुझेच नाही, तर माझेही आहे. पण एवढे दिवस मला हे माहीत असूनही मी कंसाच्या भीतीने गप्प बसण्यापलीकडे दुसरे काही करूच शकलो नाही. आता तूही मथुरेत एकटा जाऊन कंसाशी एकट्याने मुकाबला कसा करशील? तर ते मला तरी अशक्यच वाटते.

तुझे माहात्म्य मी जाणून आहे आणि तुझा पराक्रमही मी पाहिला आहे. तरी सुद्धा वसुदेव व देवकी यांची कंसाच्या तावडीतून सुटका करणे ही गोष्ट वाटते तेवढी सोपी नाहीच. एकतर कंस हा अत्यंत क्रूर व कपटी आहे. त्यामुळे तू मथुरेत

गेला आहेस हे कळताच वसुदेव व देवकीचा तात्काळ वध करण्यासही कंस कमी करणार नाही.  दुसरे म्हणजे कंसाचे सेनादल एवढे प्रचंड व शक्तिशाली आहे, की त्यांचा निःपात करणे तुलाही कठीण नव्हे, तर अशक्यच आहे.  सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे तुझ्याच हातून कंसाचा मृत्यू असल्याची पक्की खात्री खुद्द कंसालाच वाटत असल्यामुळे, तो तुला मथुरेत प्रवेशही करू देणार नाही.  मग मथुरेत जाऊन कंसापर्यंत पोहोचणे किंवा वसुदेव व देवकी यांच्यापर्यंत जाणे हे तर दूरच राहिले.''

नंदाचे बोलणे एवढा वेळ शांतपणे ऐकणारा अक्रूर थोडासा पुढे होऊन नंदाला म्हणाला, ''अरे नंदराज, त्याचसाठी तर मी येथे आलेलो आहे.  कंसाने स्वतःहूनच कृष्णाला मथुरेत बोलावले आहे.  हे ऐकून तुझा विश्वास बसणार नाही हे मला ठाऊक आहे.  परंतु हे अगदी खरेच आहे.  मीही केवळ येथे कंसाचा हा निरोपच घेऊन आलेलो नाही, तर प्रत्यक्ष कृष्णाला येथून घेऊन जाण्यासाठीच आलेलो आहे.  त्यासाठीच स्वतः कंसाने मला येथे पाठवलेले आहे.  या मागील कंसाचा हेतू कुटील आहे यात जराही शंका नाही.  कृष्णाला काही तरी कारण काढून मथुरेला बोलावून घ्यावे आणि कपटाने त्याला ठार मारावे याच एका उद्देशाने कंसाने हा सारा डाव रचलेला आहे हे निश्चित.

खरे तर, कंसाने आधी मलाच विचारले की, कृष्णाला मथुरेला कसे बोलवून घ्यावे म्हणून.  मग मीच कंसाला सुचविले, की 'कृष्ण हा स्वतः अत्यंत पराक्रमी आहे आणि पराक्रमाचा भोक्ताही आहे.  तेव्हा जर अशी पराक्रम प्रगट करण्याची संधी असलेली योजना आखली तर कृष्ण स्वतःच आपखुशीने येथे येईल.  त्याप्रमाणे कंसाने मथुरेमध्ये एका महोत्सवाची योजना आखली आणि त्यामध्ये अनेक मर्दानी खेळांना सामावून घेतले आहे.  त्यामध्ये विशेषत्वाने युवकांसाठी कुस्त्यांच्या फडाचा समावेश केलेला आहे.  त्यात मथुरेतील व मथुरेच्या आसपासच्या गावातील सर्व तरुणांनी सहभाग घ्यावा अशी कंसाची इच्छा आहे आणि कंसाची इच्छा म्हणजे त्याची ती आज्ञाच असते हे तर सर्वांनाच माहीत आहे.  त्यातूनही बलराम व कृष्णाला मथुरेला घेऊन येण्याची जबाबदारी त्याने माझ्यावर मुद्दामहून सोपवली.  कारण कंसाला माझ्या व नंदराजाच्या मैत्रीच्या संबंधांची पूर्ण कल्पना आहे.  त्यामुळे नंदाला कंसाच्या कारस्थानाची जराही शंका येणार नाही अशी खात्री कंसाला वाटत आहे.

हे नंदराज, कंसाचा हा दुष्ट हेतू माहीत असूनही मी येथे का आलो असा प्रश्न तुझ्या मनात येणे अगदी साहजिक आहे.  परंतु मी सुद्धा जाणून बुजूनच येथे आलो आहे.  एकतर कंसाची आज्ञा टाळता येणे शक्यच नव्हते.  दुसरे म्हणजे मीच स्वतः आल्यामुळे कंसाच्या मनातील हेतूची पूर्ण कल्पना मला तुम्हाला देता आली.  दुसरा कोणी आला असता तर कंसाच्या भयाने त्याने तुम्हाला कशाचाही थांगपत्ता लागूच दिला नसता.  परंतु यापेक्षाही सर्वात महत्त्वाचे कारण व हेतू माझ्या मनात अगदी खोलवर होता आणि तो म्हणजे या कृष्णाची प्रत्यक्ष भेट घेण्याचा.  कृष्णाच्या पराक्रमाच्या कथा, त्याच्या रूपगुणांचे वर्णन, गोकुळातील त्याच्या प्रेमलीलांची कीर्ती नित्य माझ्या कानावर येत असे.  त्याच्या श्रवणाने मी तर कृष्णाच्या पूर्ण प्रेमातच पडलो आहे.  कृष्णाला प्रत्यक्ष पाहिलेले नसतानाही त्याने माझ्या मनाला पूर्णपणे व्यापून टाकलेले आहे.  पण

त्यामुळे कृष्णाची प्रत्यक्ष भेट घेण्याची अत्यंत तीव्र ओढ माझ्या मनाला लागून राहिलेली होती. म्हणूनच कंसाने दिलेली ही संधी साधायचीच असा मी निश्चय केला आणि आज प्रत्यक्ष कृष्णाची भेट झाली त्याचा मला केवढा तरी आनंद झाला आहे.

हे कृष्णा, आज तुझी झालेली भेट हा माझ्या आयुष्यातील आनंदाचा सर्वोच्च क्षण आहे. एक गोष्ट मात्र निश्चित आहे, की तुझ्याविषयी जे काही मी ऐकले होते, त्यापेक्षाही तुझे रूप व तुझे व्यक्तिमत्त्व केवढेतरी अलौकिक व रमणीय आहे. या गोकुळातील सर्वांचीच मने तू आकर्षून घेतलीस यात काहीच नवल नाही. तुझ्या प्रेमामध्ये सर्व हरण्यातच विजयाचा खरा आनंद प्राप्त होतो हे अगदी खरे आहे, हे मी माझ्या अनुभवाने सांगतो. आतापर्यंत तुला न पाहताही तुझ्यावर मनातल्या मनात पुष्कळ प्रेम केले आणि तुझी मानस पूजाही केली. परंतु आज प्रत्यक्ष तुझ्या दर्शनाने माझ्या नेत्रांचे पारणे फिटले आणि माझ्या मनाला खरी शांती लाभली. म्हणूनच भेटल्यावर मी तुला प्रथम वंदनच केले. मात्र तुझ्यासाठी मी काय करावे हेच मला समजत नाही.

त्यातूनही आता एक अत्यंत कठीण गोष्ट मला करावी लागणार आहे आणि ती म्हणजे तुला येथून मथुरेला घेऊन जाण्याची. माझ्या दृष्टीने मला ती चांगलीच संधी आहे. कारण त्या निमित्ताने मला तुझा सहवास मिळणार आहे आणि तुझ्याशी बोलण्याची संधीही मिळणार आहे. परंतु त्यासाठी मला नंद व यशोदा यांना दुःख द्यावे लागणार आहे. त्यांना किती मानसिक त्रास होईल याची मला पूर्ण कल्पना आहे. सर्व गोकुळवासीयांचीही नाराजी व रोष मला ओढवून घ्यावा लागणार आहे. पण माझाही नाईलाजच आहे. कुठल्याही परिस्थितीत तुला मथुरेला घेऊन जाणे मला भागच आहे. कृष्णा, तेव्हा आता मी काय व कसे करावे हे तूच मला सांग. तुझ्या सांगण्याप्रमाणेच मी वागेन. तुझा शब्द हा मला आज्ञेप्रमाणेच आहे.''

कृष्णाच्या माहात्म्याने भारावून गेलेल्या अक्रूराच्या मनात कृष्णाविषयी केवढे तरी प्रेमही निर्माण झाले होते आणि तेच त्याच्या शब्दाशब्दांतून सहजपणे प्रगट होत होते. म्हणूनच अक्रूराच्या बोलण्याचा कृष्णाला अत्यंत संतोष झाला आणि तो कृष्णाकडून व्यक्तही झाला. कृष्ण स्वतः अक्रूराच्या जवळ गेला आणि त्याचे दोन्ही हात कृष्णाने आपल्या हातात घेतले. अक्रूराकडे प्रेमभरे नजरेने पाहत कृष्ण अक्रूराशी बोलू लागला.

''हे अक्रूरा, माझी प्रत्यक्ष भेट न होताही तुझ्या ठिकाणी माझ्या माहात्म्याची जाणीव आहे आणि तुझ्या ठिकाणी माझ्याविषयी अत्यंत श्रद्धा आहे हे पाहून मला आनंद तर होत आहेच, परंतु तुझे अत्यंत कौतुकही वाटत आहे. असे असूनही तुझी श्रद्धा ही अंधश्रद्धा नाही, तर ती सप्रमाण आहे याचे समाधान मला जास्त होत आहे. माझ्याविषयी तुझ्या ठिकाणी तुझ्या नकळतच एवढे प्रेमही निर्माण झालेले होते. म्हणूनच प्रत्यक्ष भेटीत तुझ्याकडूनही ते प्रेमच व्यक्त झाले आणि त्याचा केवढा तरी आनंद तुला झाला तसा मलाही झाला. त्यामुळेच तुझी व माझी ही प्रेमाची भेट अत्यंत आनंदाची झाली आणि संस्मरणीयही झाली.

हे अक्रूरा, आता मी एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट तुला सांगतो ती नीट ध्यानात घे. एक गोष्ट सत्य आहे की आपण सर्वच जण त्या ईश्वराच्या नियतीनेच बांधले गेलो आहोत. सर्व काही ईश्वराच्या सत्तेतच त्याच्या नियतीनुसार घडत असते. त्यामध्ये सर्व प्राणीजात हे केवळ निमित्तमात्र आहेत. म्हणूनच त्या नियतीनुसार आपले प्राप्त कर्तव्यकर्म हे आपण ईश्वरावरील प्रेमाने व श्रद्धेने करू, तर त्या कर्तव्यकर्माचा लेप आपल्याला लागणार नाही. आपल्याकडून आपले कर्तव्यकर्म ही ईश्वराची सेवा म्हणून घडेल, तर त्याचे फळ म्हणजे आपल्या मनाला समाधान व शांती लाभेल. पण त्या ईश्वराचेच एकीएक माहात्म्य जाणून जेव्हा आपल्याकडून त्या ईश्वराचीच भक्ति घडेल, तर तो ईश्वर आपल्यावर प्रसन्न होईल आणि त्याची पूर्ण कृपा आपल्याला प्राप्त होईल. त्या कृपेचे फळ म्हणजेच त्या ईश्वराचे प्रेमस्वरूप आपल्याला आपल्या अंतःकरणात अनुभवता येईल. मग जीवनातील सर्वच कर्मे केवळ त्या ईश्वरी प्रेमातून घडतील आणि त्यातूनच नित्य आनंदाचा अनुभव येत राहील. त्यामुळे आपल्या जीवनात आपण केवळ निमित्ताचे धनी न ठरता आपल्या आनंदाचे आपणच स्वामी होऊ.

आता ईश्वराच्या नियतीनुसारच तुला त्या ईश्वराची सेवा करण्याची ही संधी प्राप्त झालेली आहे, हे जाणून ईश्वरी श्रद्धेचे मनोबळ घे आणि तुझे कर्तव्यकर्म करून ईश्वराची सेवा घडल्याच्या समाधानाचा अनुभव घे. त्या ईश्वराच्या नियतीमध्ये मलाही सेवेची संधी प्राप्त झाली आहे त्याचा आनंद मी माझे कर्तव्यकर्म ईश्वराची सेवा म्हणून करून घेईन. अशा तऱ्हेने आपण दोघेही त्या ईश्वराची सेवा त्याच्या प्रेमाने करून त्या ईश्वराची प्रसन्नता अनुभवूया.

हे अक्रूरा, कंसाचा मृत्यू माझ्या हातून व्हावा अशी ईश्वराची नियती असेल तर तसे होईलच. मला त्याची काळजी करण्याचे काहीच कारण नाही. कारण ईश्वरी नियतीत योग्य वेळी योग्य त्या गोष्टी घडत असतात. त्यासाठी कोणीही उगाच धांदल गडबड केली तरी त्याचा काहीही उपयोग होत नाही. म्हणूनच कंसाचा वध करणे हे माझे ध्येय नाहीच आहे. तो जेव्हा आणि जर अटळ असेल तेव्हाच आणि तरच तो घडेल. मला त्याची चिंता मुळीच नाही. परंतु माझ्या दृष्टीने आता चिंतेचा विषय आहे तो माझे जन्मदाते वसुदेव व देवकी यांच्या दुःखाचा आणि ते सोशीत असलेल्या अत्यंत क्लेशाचा. कोणत्याही परिस्थितीत त्या उभयतांची कंसाच्या बंदीवासातून त्वरित सुटका करणे हेच माझे प्रथम व मुख्य कर्तव्यकर्म आहे. त्यासाठी हर प्रयत्नाने ताबडतोब मथुरेला जाणे हे मला अत्यंत आवश्यक आहे. तीच संधी ईश्वराच्या नियतीत कंसाच्या या आमंत्रणाच्या रूपाने माझ्यासाठी चालून आलेली आहे. त्याच संधीचा उपयोग करून घेणे अत्यंत आवश्यक आहे आणि त्यासाठी हे अक्रूरा, तुला मला सहाय्यभूत होण्याची संधी मिळत आहे हा सुद्धा त्या ईश्वरी नियतीतीलच संकेत आहे. तेव्हा आपण जराही उशीर न करता ताबडतोब म्हणजे अगदी उद्या सुप्रभातीच मथुरेला जाण्यासाठी प्रस्थान ठेवूया.

हे अक्रूरा, कंसाने आयोजित केलेल्या महोत्सवात कुस्त्यांचे सामने खेळावयास मी व बलरामदादा हे अत्यंत आतुरच आहोत. त्यामध्ये भाग घेण्यासाठीच आम्हाला बोलावले आहे हे कळल्यापासून आमचे दोघांचेही बाहू कसे सारखे फुरफुरत आहेत. आतापर्यंत आम्ही दोघे या गोकुळच्या मातीतच खेळलो. येथेच आमच्या मित्रांबरोबर कुस्ती खेळायला शिकलो आणि नेहमी त्यांच्या बरोबर खेळत राहिलो. त्यामुळे आमचा कस अजून तसा लागलाच नाही. मथुरेमध्ये आजूबाजूच्या

परिसरातील अनेक तरुण जमणार आहेत आणि खुद्द मथुरेतही कुस्ती विद्येत तरबेज असलेले अनेक मल्ल असतील. त्यांच्याबरोबर आम्हाला स्पर्धा करावी लागेल. आम्हाला कडवा प्रतिकारही होईल. पण त्यामुळेच ते कुस्तीचे सामने रोमहर्षक होतील. आम्ही त्यात नक्कीच विजयी होऊ आणि आमच्या गोकुळाचे नाव राखू याची मला पक्की खात्री आहे. तेव्हा सर्वांनी उद्या निघण्याच्या तयारीला आताच लागूया.

हे तात, हे माते, तुमच्या दृष्टीने हा प्रसंग अत्यंत भावनिक म्हणून नाजुक आहे हे मीही जाणून आहे. परंतु या प्रसंगात व मी घेतलेल्या निर्णयात तुम्ही माझ्या पाठीशी अत्यंत भक्कमपणे उभे रहाल याची मला पूर्ण खात्री आहे. कारण मी माझ्या जन्मदात्या मातापित्यांच्या सुटकेच्या हेतूनेच मथुरेला जात आहे हे तुम्ही जाणून आहात. माझे तेच कर्तव्यकर्म आहे याची जाणीव तुम्हालाही आहे. म्हणूनच भावनेने मनाला दुर्बल होऊ न देता तुम्ही माझ्यावरील अत्यंत प्रेमाने व खात्रीने मला मथुरेला जाण्याची संमती द्याल याचा मला विश्वास आहे. माझ्या जाण्यामुळे तुम्हा उभयतांना दुःख होणे अत्यंत साहजिकच आहे. परंतु दुःखाचे रूपांतर शोकामध्ये होऊ न देता मला उद्या आनंदाने निरोप द्या. तुमच्या डोळ्यातील दुर्बलतेचे अश्रू पाहून माझाही निघताना मागचा पाय पुढे टाकणे मला कठीणच जाईल. पण जेव्हा मी तुमच्या डोळ्यात माझ्याविषयीचा आत्यंतिक प्रेम, श्रद्धा व विश्वासाचा भाव पाहीन, तर माझे प्रत्येक पाऊल पुढे पुढेच पडत राहील. तुमच्या प्रेमाचे भावबळ हेच माझ्यासंगे नित्य राहील आणि माझ्याकडून पराक्रम घडवून मला यशस्वी करील असा माझा आत्मविश्वास आहे. तेव्हा अशा भावबळानेच मला प्रेमाने निरोप द्या आणि मनःपूर्वक आशीर्वाद द्या. मथुरेच्या प्रवासात व वास्तव्यात तीच शिदोरी नित्य माझ्या बरोबर राहील आणि मला सदैव जागृत, उत्साही व सबळ राखील.''

कृष्णाच्या बोलण्यातील यथार्थता सर्वांनाच जाणवत होती. त्यामुळे त्याविषयी कोणाचेही दुमत होऊच शकत नव्हते. परंतु भावनात्मक मनाला ते मानवणेही शक्य होत नव्हते. नंदाने मोठ्या प्रयत्नाने आपल्या भावनांना आवर घातला होता. परंतु यशोदेला तिचा भावनावेग आवरतच नव्हता. तिच्या डोळ्यांतील अश्रूंची संततधार चालूच होती आणि कोणाकडेही न पहाता ती मान खाली घालून बसली होती. शेवटी कृष्ण स्वतः यशोदेच्या जवळ गेला आणि तिच्या खांद्यावर आपला हात ठेवून तिला आधार देत देत अंतर्गृहात घेऊन गेला. दुसऱ्या बाजूने बलरामानेही यशोदेला आपल्या हाताने धरले आणि तोही गंभीर मुद्रेने त्यांच्याबरोबर घरात गेला. नंदाने पुढे होऊन अक्रूराचा हात धरला आणि त्याला घेऊन तो आपल्या दालनाकडे गेला.''

कृष्णाच्या जीवनातील महत्त्वपूर्ण व भावपूर्ण प्रसंगाचे वर्णन करताना तन्मय झालेला नारद एवढा अंतर्मुख झाला, की थोडावेळ त्याच्या मुखातून शब्दच बाहेर येईनासे झाले. त्याची मुद्राही अत्यंत गंभीर व थोडीशी आरक्तही झाली होती. परंतु श्रवणात तल्लीन झालेल्या लक्ष्मीची उत्कंठा एवढ्या शिगेला पोहोचली होती, की तिला ती नारदाची निःशब्दता सहनच होईना आणि तिलाही निःशब्द अवस्थेत राहवेनाच. त्या तल्लीन अवस्थेतच जणू स्वतःशीच बोलल्यासारखी ती बोलू लागली.

‘‘खरोखरी ईश्वराच्या नियतीचा खेळ मोठा विचित्रच आहे. त्यामध्ये कुठल्याही गोष्टीचा काही भरवसाच धरता येत नाही. गोष्टी घडत आल्या म्हणता म्हणता केव्हा व कशा बिघडतात आणि बिघडल्या म्हणता म्हणता पुन्हा कधी व कशा घडतात याचा काहीच नेम नाही. कालियाच्या मर्दनानंतर त्या प्रसंगाच्या निमित्ताने सर्व गोष्टी कशा छानपणे जमून आल्या होत्या. सर्व काही ठाकठीक व व्यवस्थित झाले होते. अनयाच्या ठिकाणी कृष्णाविषयी प्रेम निर्माण झाले होते आणि कृष्णाच्या माहात्म्याविषयी त्याच्या ठिकाणी आता श्रद्धाही निर्माण झाली होती. राधेचा कृष्णाविषयीचा भक्तिभावही एवढा उत्कट होऊन राहिला होता, की त्याचा आनंद तिला तर होत होताच, पण मुख्य म्हणजे आपल्या भक्तिभावाने राधा कृष्णालाही आनंदित करीत होती. सर्व गोकुळवासीयांच्या ठिकाणी सुद्धा आता कृष्णाच्या प्रेमाशिवाय व कौतुकाशिवाय दुसरे काहीच उरलेले नव्हते. खरेच गोकुळात अगदी आनंदी आनंदच होता. तेवढ्यातच कृष्णाची गोकुळ सोडून मथुरेला जाण्याची वेळ आलीच. हा योगायोग विलक्षणच म्हणावयास हवा.

अर्थात या सर्व गोष्टी काही कोणी आधी ठरवून केलेल्या नाहीत हे मलाही माहीतच आहे. पण तरीही मनात कुठेतरी हुरहुर निर्माण होतेच ना? कृष्ण गोकुळातील नंद, यशोदा व राधा यांच्यासह सर्वांना सोडून जाणार म्हणून एकीकडे त्यांच्यासाठी मोठा दुःखाचा प्रसंग, तर दुसरीकडे कृष्ण मथुरेला जाऊन वसुदेव व देवकी यांची कंसाच्या बंदीवासातून सुटका करणार म्हणून त्यांच्या दृष्टीने केवढातरी भाग्याचा क्षण. ज्या क्षणाची ते जवळ जवळ एक तप मोठ्या आतुरतेने व डोळ्यात प्राण आणून वाट पहात असतील, तो त्यांचा भाग्योदयच कृष्णाच्या रूपाने होणार होता. साक्षात परमभाग्यच कृष्णरूपाने त्यांना केवळ भेटणारच नव्हते, तर ते कायमचे त्यांचे होऊन राहणार होते.

हे नारदा, कृष्ण पुन्हा पुन्हा ‘मी वसुदेव व देवकी यांची सुटका करण्यासाठीच मथुरेला जात आहे’ असेच व एवढेच म्हणत होता. त्यावेळेस कंसाचा वधही त्याच्याकडून झाला असेल. परंतु एक गोष्ट माझ्या लक्षात आली आहे की ‘माझ्या जन्मदात्या मातापित्यांची सुटका करून आणि कंसाचा वधही करून परत मी गोकुळास येईनच’ असे निश्चित वचन काही कृष्णाच्या मुखातून एकदाही बाहेर पडले नाही. याचेच मला वारंवार मोठे नवल वाटत आहे आणि मला वाटते त्याच्यातच निश्चितपणे पुढे घडणाऱ्या कृष्णचरित्राचे रहस्य कुठेतरी दडलेले आहे. माझी तर त्याविषयी आता खात्रीच होत चाललेली आहे. कारण कृष्णाने ठरवले असते तर कंसाचा वध करून आणि वसुदेव व देवकी यांची सुटका करून कृष्ण त्यांना पुन्हा गोकुळात घेऊन येऊ शकला असता. पण तसेच काहीच आश्वासन कृष्ण त्यांना देत नव्हता. म्हणजे एकतर तसे त्याला करायचे नव्हते किंवा ईश्वराच्या नियतीत तसे घडायचे नव्हते आणि त्याची पूर्ण जाणीव कृष्णाला होती. म्हणूनच गोकुळात परत येण्यासंबंधी कृष्ण काहीच बोलत नव्हता. मला वाटते कृष्णाचे असे न बोलणेच केवढे तरी सांगून राहत होते. तेव्हा हे नारदा, हा पुढील सर्व इतिहास मला कृष्णाच्या अंतरंगासह विशद करून सांग. ते श्रवण करण्याची माझी आतुरता अगदी कळसाला पोहोचलेली आहे.’’

लक्ष्मीचे बोलणे जरी सुरुवातीला स्वगत बोलण्यासारखेच होते, तरी हळुहळू देहभानावर येत असलेल्या नारदाला पाहून मग लक्ष्मी नारदालाच उद्देशून बोलू लागली होती. नारदालाही लक्ष्मीच्या विचारात्मक बोलण्याचे कौतुक वाटत होते. लक्ष्मी नुसतेच ऐकत नव्हती, तर तिच्याकडून त्या ऐकण्यावरती विचारही घडत होता आणि ऐकूनही अप्रगट राहणाऱ्या गोष्टी जाणून घेण्याची आवश्यकता व आतुरता लक्ष्मीच्या ठिकाणी होती. त्याचाच संतोष व समाधान नारदाला वाटत होते. म्हणूनच लक्ष्मीकडे बघून आधी नारद कौतुकाने हसला आणि नंतर त्याने बोलावयास आरंभ केला.

''हे लक्ष्मी, प्रत्येक गोष्टीवर विचार करण्याची तुझी वृत्ती अगदी योग्यच आहे. फक्त विचारांची दिशा मात्र योग्य म्हणजे होकारात्मक हवी आणि खरी होकारात्मक दृष्टी ही कृष्णाचीच, हेही नेहमी लक्षात ठेवावयास हवे. म्हणजे मग आपलीही विचारांची दिशा योग्य, म्हणजे कृष्णाच्या अंतःकरणाकडेच राहील. हे लक्ष्मी, ईश्वराच्या नियतीबद्दल जे तू म्हटलेस ना ते अगदी खरेच आहे. त्या नियतीत केव्हा काय घडेल याचा भरवसा नसला तरी त्या नियतीला विचित्र म्हणणे योग्य ठरणार नाही. त्या नियतीत घडणाऱ्या किंवा घडाव्या सारख्या वाटणाऱ्या गोष्टींविषयी सामान्याच्या मनात काही तरी कल्पनेचे चित्र आधी निर्माण होते. मग त्या काल्पनिक चित्राप्रमाणे काही घडले नाही की तो त्या नियतीला दोष देतो आणि त्या नियतीलाच विचित्र म्हणतो. त्या नियतीत घडणाऱ्या गोष्टींमुळे कोणाच्या अपेक्षांची कधी पूर्ती होते, तरी कधी कोणाचा अपेक्षाभंगही होतो. परंतु ईश्वराची नियती ही निरपेक्षच असते. त्यामुळे नियतीतील एखादी गोष्ट जरी कोणाच्या मनासारखी किंवा कोणाच्या मनाविरुद्ध घडताना दिसली तरी ईश्वराची नियती मात्र कोणाच्या बाजूने किंवा कोणाच्या विरुद्ध अशी कधीही नसते. म्हणूनच ईश्वराची नियती अत्यंत शुद्ध आहे.

ज्या महात्म्यांचे अंतःकरण ईश्वरी अनुभवामुळे शुद्ध असते त्यांनाच ती ईश्वरी नियती यथार्थाने आकलन होते आणि त्यांच्याकडूनच त्या ईश्वरी नियतीनुसार निरपेक्ष व निःस्वार्थी असे आचरण घडते. त्यांच्याचकडून योग्य ते कर्तव्यकर्म निरभिमानाने, पण ईश्वरी जाणिवेने घडते. त्यामुळेच सर्व आवश्यक व योग्य ती कर्तव्य कर्मे करूनही त्यांना त्या कर्मांचा लेप अजिबात लागत नाही. कर्म करूनही त्यांची मने दूषित होत नाहीत आणि त्या कर्मांच्या फळांचा त्या महात्म्यांच्या शुद्ध अंतःकरणाच्या ठिकाणी बरा किंवा वाईट असा काहीच परिणाम होत नाही. लक्ष्मी, कृष्णाच्या अंतःकरणाची अवस्थासुद्धा अगदी अशीच होती, हे लक्षात ठेव. पुढे काय व कसे घडणार आहे किंवा पुढे काय व कसे घडावे या संबंधी त्याच्या ठिकाणी कुठलीही कल्पना नव्हती. त्यामुळेच मनाच्या अगदी मोकळेपणाने तो त्याचे प्राप्त कर्तव्यकर्म करण्यास सादर व तत्पर होऊन राहिला.

*****

# गोकुळवासियांचा शोक

**हे** लक्ष्मी, कृष्ण गोकुळ सोडून जाणार म्हणून गोकुळवासीयांना दुःख होणे अगदी साहजिकच होते. कृष्णावरील त्यांच्या प्रेमाचेच तर ते लक्षण होते, नाही का? कृष्णाच्या प्रेमळ सहवासाला व नित्याच्या मार्गदर्शनाला त्यांची जीवने सवयीची झालेली होती. त्यामुळे काही दिवसांसाठी का होईना, पण कृष्ण गोकुळाच्या बाहेर जाणार आहे एवढी कल्पनासुद्धा कोणाला करवेना. कारण एवढ्या दिवसात कृष्णाचे गोकुळाच्या बाहेर असे जाणे कधीच झाले नव्हते. त्यातूनच कृष्ण मथुरेला कंसाच्या राज्यात काही महोत्सवाच्या निमित्ताने जात असला, तरी त्याचबरोबर 'कृष्णाचे खरे मातापिता वसुदेव व देवकीच असून ते कंसाच्या बंदीवासात आहेत' ही बातमी सुद्धा हळुहळू सर्व गोकुळात पसरलीच होती. त्यामुळे दुसऱ्या दिवशी सकाळीच सर्व गोकुळवासीयांनी नंदाच्या राजवाड्यावर एकच गर्दी केली.

सुप्रभाती जाग आल्यावर कृष्णाने आपले आन्हिक उरकून निघण्याची तयारी सुरू केली. खरे तर, रात्रभर कोणीही झोपलेच नव्हते. यशोदेच्या डोळ्यातील पाणी तर ठरतच नव्हते. कृष्ण व बलराम या उभयतांना आपल्या कुशीत घेऊन ती बिछान्यावर आडवी पडली होती खरी, परंतु तिच्या डोळ्याला डोळा लागतच नव्हता. ते शक्यच होत नव्हते. कृष्ण व बलरामही जरी डोळे मिटून यशोदेच्या कुशीत शिरले होते तरी रात्रभर तेही जागेच होते आणि अंगावरून सतत फिरणाऱ्या यशोदेच्या हाताच्या प्रेमळ स्पर्शाची ऊब अनुभवीत होते. दुसरीकडे नंदसुद्धा आपल्या दालनात अक्रूरासह विश्रांती घेत होता. दोघे एकमेकांशी बरेच काही बोलतही होते. पण त्याकडे त्यांचेच लक्ष नव्हते. कधी एकदा उजाडते असेच त्या दोघांनाही झाले होते. अशा परिस्थितीत सकाळी कोणाच्याही ठिकाणी उत्साह असणे शक्यच नव्हते.

पण कृष्ण मात्र त्याच्या नेहमीच्या सहज वृत्तीने वावरत होता आणि उत्साह हा तर त्याच्या वृत्तीचाच एक भाग होता. कृष्णाचे अंतःकरणच ईश्वरी प्रेमाने प्रवाही झालेले असल्यामुळे त्या त्या वेळेस ती ती गोष्ट मनापासून व अत्यंत प्रेमाने करून, कृष्ण लगेचच मनाने मोकळा होऊन पुढील प्रसंगासाठी पुन्हा उत्साहाने सामोरा जायला मनापासून तयार असे. त्यामुळे सकाळी उठल्यापासून स्वतःची सर्व तयारी करून कृष्णाची निघण्याची लगबग सुरू झाली. एखादी गोष्ट एकदा का करायचीच असे ठरले की मग मात्र कृष्णाला जराही उसंत नसे. केव्हा एकदा त्या गोष्टी करून मोकळे होतो असेच कृष्णाला होऊन राही. या त्याच्या स्वभावानुसार कृष्णाची निघण्याची गडबड सुरू झाली.

कृष्णाने सर्व प्रथम नंदाच्या दालनात जाऊन नंदाला वाकून प्रणाम केला आणि नंदाचे आशीर्वाद मागून घेतले. नंदाने कृष्णाला आपल्या कुशीतच कवटाळले आणि त्याच्या मस्तकाचे अवघ्राण केले. कृष्णाच्या पाठोपाठ बलरामही नंदाची व भेट व आशीर्वाद घेण्यासाठी आला असता, नंदाने बलरामालाही मोठ्या प्रेमाने आपल्या मिठीत घेतले आणि त्याच्यावरही प्रेमाचा वर्षाव केला. कृष्णाने अक्रूरालाही वाकून नमस्कार करण्याचा प्रयत्न केला असता अक्रूराने कृष्णाचे दोन्ही हात आपल्या दोन्ही हातात प्रेमाने धरले आणि नम्रतापूर्वक आपल्या डोळ्यांना लावले. त्यानंतर कृष्णाचे दोन्ही हात अक्रूराने आपल्या मस्तकावर ठेवले आणि कृष्णाचे जणू आशीर्वादच घेतले. त्यानंतर नंदाच्या दालनातून कृष्ण बाहेर आला आणि

अक्रूराने बरोबर आणलेल्या रथाची कृष्णाने स्वतः पाहणी केली. रथाबरोबर असलेल्या घोड्यांनासुद्धा कृष्णाने स्वतःच्या हाताने खरारा केला आणि त्यांना चारा पाणी देऊन त्यांच्या पाठीवर प्रेमाने थोपटले. कृष्णाच्या प्रेमळ स्पर्शाने उत्तेजित होऊन त्या घोड्यांनी सुद्धा फुरफुरून कृष्णाच्या आपलेपणाला प्रतिसाद दिला.

अशा तऱ्हेने निघण्याची सर्व तयारी व्यवस्थित झालेली आहे अशी खात्री करून कृष्ण मग निरोप घेण्यासाठी यशोदेच्या दालनात गेला. यशोदा देवघरात देवाच्या मूर्तीसमोर हात जोडून व नेत्र मिटून बसलेली होती. नेत्रातून अश्रूंची संतत धार वाहतच होती. कृष्णही हळूच यशोदेच्या शेजारी जाऊन बसला. त्यानेही आपले हात जोडले आणि नेत्र मिटून घेतले. थोड्या वेळाने कृष्णानेही त्याचे अश्रूंनी डबडबलेले नेत्र उघडले आणि आपला हात यशोदेच्या खांद्यावर ठेवून कृष्ण यशोदेला अगदी बिलगूनच बसला. मग यशोदेनेही आपले नेत्र उघडले आणि कृष्णाला आपल्या अधिक जवळ घेतले. मूर्तीसमोर ठेवलेले चांदीच्या वाटीतील दूध साखर यशोदेने आपल्या हाताने कृष्णाला पाजले आणि प्रसादाचा खरवस कृष्णाला भरवला. यशोदा तर तिकडून उठायला तयारच होत नव्हती. कारण साहजिकच तसे करण्यासाठी तिचे मनच घेत नव्हते. परंतु मग कृष्ण स्वतःच उठला आणि आपल्या हाताने धरून यशोदेलाही त्याने उठवले. यशोदेचा धरलेला हात तसाच धरून ठेवून तिला हळुहळू चालवीत तिच्या दालनाच्या बाहेर घेऊन आला, तर राजवाड्याच्या बाहेर गोकुळवासीयांचा नुसता पूर लोटलेला होता.

कृष्ण नंदाच्या राजवाड्याच्या प्रांगणात आल्याबरोबर सर्व गोकुळवासी धावतच पुढे आले आणि कृष्णाच्या सभोवार त्यांनी एकच गर्दी केली. कृष्णाने हाताच्या खुणेने सर्वांना शांत राहण्यास सांगितले आणि हसून प्रेमाने सर्वांचे स्वागत केले. थोडा वेळ सर्वकडे शांतता पसरली होती. तेवढ्यातच गर्दीतून एक अस्फुट हुंदक्याचा आवाज आला. त्या नंतर दुसरा, मग तिसरा असे एका मागून एक हुंदके फुटू लागले आणि सर्वांनाच दुःख अनिवार होऊन राहिले. हळुहळू दबलेले हुंदके मोठे होऊ लागले आणि अनेकांनी आक्रोशच करावयास सुरुवात केली. अनेक जण कृष्णाच्या जवळ धावले आणि त्याचे हात धरून त्याला विनवणी करू लागले.

'कृष्णा, आम्हाला सोडून जाऊ नकोस. आम्हालाही तुझ्याबरोबर घेऊन चल. तुझ्याशिवाय आम्हाला जगता येणे शक्यच नाही. कृष्णा, कंस हा अत्यंत क्रूर आहे. त्याला भेटायला जाऊन तू आमच्या जिवाला घोर लावू नकोस. आमच्यासाठी तू जीव की प्राण आहेस. काहीतरी कपट करून तुझा घात करण्याचाच कंसाचा डाव असणार हे नक्की. तेव्हा तू स्वतःहून तो डाव साधायला कंसाला मदत करू नकोस. त्यातूनही कृष्णा, मथुरेला जाण्याचा तुझा जर निर्धारच असेल तर आम्हीही तुझ्याबरोबर येणार. कृष्णा, एवढे दिवस तू आम्हाला तुझ्या सहवासाची व प्रेमाची गोडी लावलीस ना. मग आता आम्हाला असे एकटे सोडून तू जाऊच शकत नाहीस हे लक्षात ठेव. तू जर नसशील तर मग आमची काळजी कोण घेणार आणि आम्हावर प्रेम तरी कोण करणार? तेव्हा ते काही नाही. कृष्णा, तू आम्हाला सोडून जायचे नाहीस म्हणजे नाहीस. आणि आम्हीही तुला जाऊ देणार नाही म्हणजे नाहीच.'

अशा तऱ्हेने अनेक वचने कृष्णावरच्या प्रेमापोटी तेथे जमलेल्या व हवालदिल झालेल्या गोकुळवासीयांच्या मुखातून एका मागून एक आणि अगदी भराभर बाहेर पडत होती. धड कोणी कोणाला बोलू देत नव्हते आणि धड कोणाचे वाक्य

बोलून पूर्ण करणे कोणाला शक्य होत नव्हते. जे बोलत नव्हते ते सारखे रडत होते आणि जे बोलण्याचा प्रयत्न करत होते त्यांना बोलता येणे शक्यच नव्हते. सर्वकडे एकच दुःखाचा कल्लोळ झालेला होता. सर्वांची ती दयनीय व केविलवाणी अवस्था पाहून एवढा वेळ प्रयत्नपूर्वक धरून ठेवलेला नंदाचा संयमही मग सुटला. त्यानेही आपल्या नेत्रांतील अश्रूंना मोकळेपणाने वाहू दिले. यशोदेचा संयम तर कधीच सुटलेला होता. तिचे डोळे तर अश्रू गाळून अगदी कोरडेच झाल्यासारखे झाले होते. अक्रूरालाही दुःख आवरेनासे झाले.

कृष्ण मात्र शांत व स्तब्धच राहिला होता. सर्वांना आपले दुःख व्यक्त करून मन मोकळे करण्यासाठी कृष्णाने संधी व वेळ दिला. पण जेव्हा त्याच्या लक्षात आले, की हा शोक व दुःखावेग कमी न होता वाढतच जात आहे, तेव्हा मात्र कृष्णाने आपल्या मृदू पण निश्चयात्मक वाणीने बोलावयास सुरुवात केली.

‘‘हे गोकुळवासीयांनो, तुमचे दुःख मी समजू शकतो. माझ्यावरील अत्यंत प्रेमापोटीच तुम्हाला माझी काळजी वाटत आहे आणि तुम्ही मला मथुरेला जाण्यापासून परावृत्त करीत आहात हे मी जाणून आहे. हे तुमचे माझ्यावरील प्रेम हीच माझी गोकुळातील आतापर्यंतची कमाई आहे. तुमचे जे काही प्रेम मला लाभले त्याला दुसऱ्या कशाचीही तोड नाही आणि त्याच्याशी दुसऱ्या कशाची तुलनाही होणे शक्य नाही. आजपर्यंत तुमच्या ज्या निरागस व शुद्ध प्रेमाचा अनुभव मी घेतला, त्याचीच जमलेली पुंजी मला माझ्या पुढील आयुष्यात उपयोगाला येणार आहे. कारण असे साधे व निगर्वी प्रेम जे मला माझ्या भाग्याने बालपणातच मिळाले, तसे मला पुन्हा कधीही व कोठेही मिळणे शक्यच नाही. म्हणूनच या तुमच्या प्रेमाची खरी किंमत मी जाणून आहे. त्याचे मूल्य कशानेही होऊ शकणार नाही.

मीही तुमच्यावर अगदी मनापासून प्रेम केले. मी सदैव तुम्हाला आपलेच समजले, आपलेच म्हटले आणि त्याच आपलेपणाने तुमच्याशी वागलोही. माझ्यापरीने आणि मला जमेल तेवढी व तशी मी या गोकुळाची सेवा केली. नंदाचा जरी मी मुलगा असलो तरी मी मात्र मला नेहमी या गोकुळाचा एक सेवकच समजत आलो. नेहमीच गोकुळाच्या कल्याणाची काळजी केली. सदैव गोकुळच्या हिताचीच चिंता करीत राहिलो. यात माझा जराही मोठेपणा नाही. तुमच्याकडून मिळालेल्या प्रेमाच्या ऋणातून मुक्त होण्याचा तो अल्पसा प्रयत्न होता एवढेच! तेव्हा एवढी वर्षे आपण जे परस्परांचे प्रेम अनुभवले त्या प्रेमाचे बळ घेण्याची वेळ आता आलेली आहे. त्यासाठी आपण सर्वांनीच आपल्या मनाची तयारी करणे अत्यंत आवश्यक आहे.

हे गोकुळवासीयांनो, हे प्रियजन हो, मी आता काय सांगतो ते नीट लक्षपूर्वक ऐका. एका विलक्षण योगायोगानेच माझे गोकुळात येणे झाले ही गोष्ट आता तुम्हालाही कळलेलीच आहे. यालाच ईश्वराची इच्छा म्हणतात आणि ईश्वराचीच इच्छा ही सर्वश्रेष्ठ आहे हे लक्षात ठेवा. आपले सर्वांचे नाते हे एकीएक त्या ईश्वराशीच आहे. तेच नाते खरे आहे आणि खऱ्या प्रेमाचेही आहे. बाकी संसारातील नाती ही सर्व निमित्तमात्र व म्हणून तात्पुरती आहेत. ईश्वराच्या नात्याची आठवण जर आपण नित्य जागी ठेवू, तर आपल्याला सर्व सांसारिक नाती नीटपणे सांभाळता येतील आणि आपली कर्तव्यकर्मेही योग्य

प्रकारे करता येतील. मग जीवनात कसेही प्रसंग आले तरी ही ईश्वराची इच्छा आहे असे समजून आणि त्या इच्छेलाच प्रमाण मानून आपल्याला सर्व प्रसंगांना धैर्याने सामोरे जाता येईल. आपले मनाचे समाधान व शांती नित्य कायम राहील. पुढे आपल्या जीवनात काय घडणार आहे हे आज कोणालाच सांगता येणार नाही. पण जे काही घडेल त्याचा आनंद आपल्याला निश्चितपणे अनुभवता येईल हे मी माझ्या अनुभवाने सांगत आहे.

हे गोकुळवासीयांनो, आज तुम्हा सर्वांच्या प्रेमाचे बळ व शुभेच्छा घेऊन मी माझे कर्तव्यकर्म करण्यासाठी मथुरेला जात आहे. कंसाच्या बंदीवासात गेली बारा वर्षे खितपत पडलेल्या माझ्या जन्मदात्या मातापित्यांची मला ताबडतोब सुटका करावयाची आहे. त्यांच्या माझ्यावरील ऋणापोटीचे हे माझे अत्यावश्यक कर्तव्यकर्म आहे. त्यात मी यशस्वी होईन याची मला पूर्ण खात्री आहे. त्या नंतर पुढे काय घडणार आहे हे मलाच काय, पण कोणालाच सांगता येणार नाही. माझे गोकुळात परत येणे एखादे वेळेस घडेल किंवा एखादे वेळेस घडूही शकणार नाही. परंतु त्यावर आता आपले प्रेम अवलंबून नाही याची पक्की जाणीव ठेवा. आपल्या प्रेमाचे नित्य स्मरण ठेवा. त्या प्रेमाला नित्य जागे ठेवा आणि त्याच प्रेमाने तुमचे पुढील सर्व प्राप्त जीवन आनंदाने जगा. तुमचे जीवन यशस्वी झाल्याची हीच पावती आहे.

हे गोकुळवासीयांनो, तुम्हाला आणखी एकच विनंती मला करायची आहे. माझे तात नंदमहाराज व माझी आई यशोदामाई यांना प्रेमाने धरून रहा आणि त्यांची काळजी घ्या. माझी व बलरामाची अनुपस्थिती त्यांना केव्हाही जाणवू देऊ नका. तुम्हाला सर्व प्रकारचे रक्षण व आधार देण्यास नंद महाराज समर्थ आहेतच. ते तुमचा योग्य प्रकारे सांभाळ करतीलच. पण त्यांच्या स्वास्थ्याकडे मात्र तुम्हीच लक्ष द्यायचे आहे. माझ्या अत्यंत प्रेमाचा असलेला अनय हा नंद व यशोदामाईला सर्वतोपरीने सहाय्य करेल याची मला खात्री आहे. माझा लाडका पेंद्याही आता दुर्बळ राहिलेला नाही. तोही तुमच्या अडीअडचणींना केव्हाही धावून येईल हे मला पक्केपणाने ठाऊक आहे. त्याला स्वस्थ बसवणारच नाही.

सर्वांत महत्त्वाचे म्हणजे मला अत्यंत प्रिय असलेली राधा मी तुमच्यासाठी गोकुळात ठेवून जात आहे. माझ्यावरच्या अलोट प्रेमाने व अखंड भक्तिभावाने तिचे अंतःकरण अगदी माझ्या अंतःकरणासारखेच प्रेमस्वरूप झालेले आहे. ईश्वराच्या खऱ्या प्रेमाचे व भक्तिचे माहात्म्य तिच्याकडून सहजतेने प्रगट होत राहील. त्याचा जेवढा म्हणून तुम्हाला लाभ करून घेता येईल तेवढा जरूर करून घ्या आणि ईश्वराविषयीची आस्तिकता, भाविकता व श्रद्धा कायम ठेवा. त्याचाच आधार तुम्हाला तुमच्या जीवनात नेहमी मिळत राहील.

हे प्रिय गोकुळवासीयांनो, शेवटी एकच सांगतो की माझ्या पुढील आयुष्यात जो काही पराक्रम, परोपकार किंवा प्रेम माझ्याकडून कोणाच्याही निमित्ताने जरी घडले, तरी त्याचा पाया या गोकुळातच घातला गेलेला आहे. गोकुळामध्ये अनुभवलेल्या सर्व नात्यापरत्या प्रेमाचा हा पाया अत्यंत सखोल व सबळ आहे. त्याची जाणीव माझ्या अंतःकरणात अगदी खोलवर व सदैव जागृत असेल. तीच जाणीव माझ्या पुढील जीवनाचे मूळ असेल हे अगदी खरे आहे. तेव्हा सर्वांनी आता मला त्याच प्रेमाने निरोप द्यावा. माझ्या पुढील जीवनासाठी व कार्यासाठी प्रेमपूर्वक शुभाशीर्वाद द्यावेत आणि मथुरेला निघण्यासाठी आता मला अनुमती द्यावी.''



असे म्हणून कृष्णाने आपले दोन्ही हात जोडून सर्वांना नमस्कार केला. कृष्णाच्या अंतःकरणातील गोकुळाविषयीचे दाटून असलेले प्रेम असे मोकळे झाले आणि सर्वांच्या थेट अंतःकरणात शिरले. त्या प्रेमाने सर्वांचीच मने भरून आली. त्यांचा कंठ दाटून आला आणि कंठातील गहिवर नेत्रांमधून मोकळा होऊ लागला. पण हे अश्रू आता दुर्बलतेचे किंवा असहाय्यतेचे नव्हते, तर कृष्णाविषयीच्या प्रेमाचे व कृतज्ञतेचे होते. हे प्रेम व ही कृतज्ञताच त्यांच्या मनाला सबळ करीत होती आणि त्यांचे धैर्यबळ वाढवीत होती. कृष्णाचे बोलणे संपता संपताच अनय पुढे आवेगाने कृष्णाजवळ आला आणि त्याने कृष्णाला प्रेमाने मिठीच मारली. रडवेला झालेला पेंद्याही आपल्या हाताने आपले डोळे पुशीत पुशीत कसाबसा पण धावतच पुढे आला आणि कृष्णाच्या कुशीतच शिरला. कृष्णाने अनय व पेंद्या यांना तसेच आपल्या जवळ धरून ठेवले. थोड्या वेळाने प्रयत्नपूर्वक कृष्णाने त्या दोघांनाही बाजूला केले आणि समोर पाहिले, तर राधा हळुहळू एकेक पाऊल टाकीत सर्व गर्दीतून वाट काढीत कृष्णाच्या जवळ येत होती.

*****

# राधेचा कृष्णाला भावपूर्ण निरोप

**रा**धा जशी कृष्णाच्या जवळ व सन्मुख येऊन उभी राहिली, तशी ती सर्वांच्याच नजरेचे सहजच लक्ष्य झाली. एवढेच काय कृष्णसुद्धा राधेकडे पहातच राहिला. नेत्र अश्रूंनी पूर्णपणे भरून आलेले असूनही राधेच्या मुखावर स्मित हास्य झळकत होते. राधेचे ते प्रसन्न रूप पाहून कृष्णाचे अंतःकरण तर भरून आलेच, पण कृष्ण अतिशय आनंदीतही झाला. राधेला भेटण्यासाठी तो दोन पावले पुढे झाला. तेवढ्यात राधेने आपल्या बरोबर आणलेली विविध सुमनांची सुगंधित माळ कृष्णाच्या गळ्यामध्ये घातली आणि आपल्या हातामध्ये आणलेला बेसनाचा लाडू कृष्णाच्या मुखात भरवला. त्यातील थोडासा लाडू कृष्णानेही राधेच्या मुखात भरवला. आपल्या गळ्यातील फुलांची माळ काढण्याचा प्रयत्न करणाऱ्या कृष्णाला राधेने तसे न करण्याविषयी विनंती केली असता, कृष्णाने हसून राधेच्या म्हणण्याला संमती दिली. राधा व कृष्ण यांच्या प्रेमभक्तिभावाने सर्वांनाच तोष झाला आणि सर्वांनाच गहिवरून आले. राधा तर पूर्णपणेच भारावली होती. तशाच अवस्थेत तिने कृष्णाला दोन्ही हात जोडून वंदन केले आणि ती कृष्णाशी हळुवार व मधुर आवाजात बोलू लागली.

‘‘हे कृष्णा, ही विविध सुमनांची माळ मी स्वतः माझ्या हाताने गुंफली आहे. तुझ्या गळ्यात ती माळ घातल्यानंतर तुझ्या सौंदर्याने व प्रभावाने त्या माळेचे व त्यातील फुलांचेच सौंदर्य व शोभा वाढलेली आहे. खरे तर कृष्णा, तुझ्यामुळेच या फुलांना शोभा आलेली आहे. स्वतंत्रपणे अशी त्या फुलांची काही गणतीच नाही. कृष्णा, आम्हा गोकुळवासीयांचेही अगदी तसेच आहे. खरे तर, आम्ही अत्यंत सामान्य जीव. या माळेतील फुलांप्रमाणेच आम्ही विविध स्वभावाची, भिन्न गुण-दोषांची, साधीभोळी माणसे. पण तुझ्या प्रेमसूत्रात तू आम्हाला बांधून घेतलेस आणि अगदी प्रेमाने या माळेप्रमाणे तुझ्या उराशी आम्हाला धरून ठेवलेस. केवळ म्हणूनच आम्हाला महत्त्व आल्यासारखे दिसत आहे.

आमच्या भोळ्या भाबड्या भावाचा तू पुढाकार घेऊन स्वीकार केलास आणि त्याला प्रेम म्हणून त्याचे कौतुकही तूच करीत आलास. खरे तर, आमच्यावर खरे प्रेम तूच केलेस. ते समजायला आणि त्याला प्रतिसाद द्यायलाही आमच्याकडून कितीतरी काळ जावा लागला. पण तू मात्र जराही नाराज न होता किंवा न रागावता तुझ्या प्रेमाचा वर्षावच अनेक अंगाने आमच्यावरती करीतच राहिलास. त्यासाठी कितीतरी कष्ट व क्लेश तुला सहन करावे लागले. पण तू कधीही तक्रार केली नाहीस किंवा तुझी नाराजी व्यक्त केली नाहीस. त्याच तुझ्या प्रेमवर्षावातून आमच्या ठिकाणी प्रेमाची एखादी जलधार निर्माण झालेली तुला दिसली, तरी तुला एखादा सागर पाहिल्यासारखा आनंद झाला. हे तुझ्या ठिकाणी आमच्याविषयी असलेल्या आत्यंतिक आपलेपणाचेच लक्षण आहे.

कृष्णा, तुझे प्रेम आम्हाला महद्‌भाग्याने मिळालेले आहे आणि त्याला आम्हाला अजूनही पूर्णपणे पात्र व्हायचे आहे याची जाणीव आम्हाला नित्य राहील. एक दिवस तुझ्या प्रेमाला आम्ही खऱ्या अर्थाने पात्र होऊच याची आम्हाला पूर्ण खात्री आहे. यामध्ये आमच्या अहंकाराला जराही वाव नाही कारण हे माहात्म्य तुझ्या प्रेमाचेच आहे. तुझे प्रेमच मुळी

परिपूर्ण आहे आणि ते प्रेम आम्हालाही पूर्ण करून ठेवीलच ठेवील अशी आमची दृढ श्रद्धा आहे. ते अगदी सहजपणे पण निश्चितपणे घडणारच आहे. त्यात नवल वाटण्यासारखे काहीच नाही. हा सर्व महिमा तुझा आणि केवळ तुझ्या प्रेमाचाच आहे. खरे तर, तू व तुझे प्रेम हे वेगळे नाहीच. मग आम्हीही तुझ्या प्रेमाने युक्त होऊन राहू, तर तुझ्यापासून वेगळे असे राहणारच नाही. मग ईश्वरी सत्तेमध्ये आपण बाह्यांगाने कुठेही असू. एकत्र असू नाहीतर वेगळे असू. पण एक गोष्ट खरी आहे की तू आम्हाला तुझ्या हृदयात अत्यंत प्रेमाने स्थान दिले आहेस आणि तू स्वतःही त्याच प्रेमाने आमच्या अंतरात घर करून राहिला आहेस. तेथेच आम्ही तुला नित्य स्मरू, नित्य पुजू आणि नित्य भजूही. तुझ्या अस्तित्वामुळे आमचे अंतर हे तुझे मंदिरच होऊन राहणार आहे, जेथे तुझ्या रूपाचे ध्यान व तुझ्या प्रेमगुणांचे गायन नित्य घडत राहील. यापेक्षा दुसरा आनंद तो काय आणि या परते दुसरे सुख ते काय असू शकते?

हे कृष्णा, तू आम्हाला नेहमीच ईश्वरी सत्तेची जाणीव करून देत असतोस. पुढे काय घडेल ते ईश्वराच्या इच्छेनुसार घडणार असेही तू वारंवार सांगत असतोस आणि ते खरेच आहे यात शंका नाही. पण आम्हाला तुझी इच्छा हीच प्रमाण आहे आणि तशीच ती सदैव राहीलही. कारण ईश्वरस्वरूपाचा अनुभव घेणाऱ्या तुझी इच्छा व ईश्वराची इच्छा ही एकच आहे अशी आमची श्रद्धा आहे आणि आमच्या अनुभवाने ती श्रद्धा आता अत्यंत दृढ झालेली आहे. आता मथुरेला जाऊन तुझ्या मातापित्यांची कंसाच्या बंदीवासातून सुटका करण्याचे तुझे कर्तव्यकर्म पुरे करण्याची तुला इच्छा झालेली आहे आणि आमच्यासाठी तीच ईश्वराची इच्छा आहे. त्या नंतरही तुझ्या पुढील जीवनात जे जे निर्णय तू घेशील ते आमच्यासाठी ईश्वराची इच्छा म्हणूनच असतील. त्या त्या परिस्थितीनुसार आवश्यक असलेले निर्णयच तू घेणार हे नक्की. कारण तुझे सर्व निर्णय हे निरपेक्ष व दुसऱ्यांच्या हितासाठी असतात याची जाणीव आमच्या ठिकाणी स्वानुभवाने आता कायम झालेली आहे.

हे परमप्रिय कृष्णा, तू गोकुळ सोडून जात आहेस याचे आम्हाला निश्चितच दुःख होत आहे आणि तसे ते होणारच. कारण आमची अंतःकरणे तुझ्या प्रेमामुळेच अशी संवेदनाशील झालेली आहेत. परंतु एक गोष्ट मी तुला आश्वासनपूर्वक सांगते की आम्ही शोकाकुल होऊन नक्कीच राहणार नाही. उदासीनता किंवा नैराश्य यांना आमच्या ठिकाणी जराही थाराच मिळणार नाही. तुझेच प्रेम आमच्या ठिकाणी जागे असेल आणि मोकळेपणाने खेळून रंगत राहील. ही सर्व किमया आमच्या ठिकाणी तुझ्या प्रेमामुळेच होऊन राहिलेली आहे. तुझे हे प्रेम आम्हाला लाभले आणि फळले हेच आमचे परमभाग्य आहे. तू गोकुळ सोडून जाणार या पेक्षा तू आमच्या हृदयात कायमचे वास्तव्य करून राहणार आहेस हीच तुझी आमच्यावरची कृपा आहे आणि हेच तुझे आमच्यावरील अनंत उपकार आहेत. त्या उपकारांचे ऋण फेडण्याची भाषा करणेही अहंकाराचे ठरेल. पण त्या ऋणातच सदैव राहून आम्ही तुला आमच्या भावाची अंजली नित्य अर्पण करीत राहू.

हे कृष्णा, तुझे खरे माहात्म्य पूर्णपणे व यथार्थपणे जाणणे हे अशक्यच आहे. परंतु तू साक्षात ईश्वराचाच अवतार आहेस हे मात्र पूर्ण सत्य आहे. त्यामुळे तुझे जीवन व कार्यही अत्यंत व्यापकच असणार. त्याला एका स्थळी व एका काळी

कोणीही बांधून ठेवू शकणारच नाही. त्यामुळे बाह्यांगाने तुला गोकुळातच थांबवून ठेवणे कोणालाही शक्यच होणार नाही. कारण तू काही फक्त आम्हा गोकुळवासीयांचाच आणि केवळ आमच्यासाठीच नाहीस. तू सर्वांचा व सर्व जगासाठीचा आहेस. आमच्या सारख्या कितीतरी जीवांचा उद्धार तुला करायचा आहे. अनेक दुःखितांची व पीडितांची दुःखे व कष्ट दूर करून तुला त्यांना रक्षण व आधार द्यायचा आहे. अनेकांना तुझ्या प्रेमाचा अनुभव देऊन त्यांच्या मनाला शांती व समाधान तुला प्राप्त करून द्यायचे आहे. हेच तुझे माहात्म्य आहे आणि हे तुझे माहात्म्य प्रकर्षाने या जगात प्रगट व्हावे ही आमची सर्वांची इच्छा आहे आणि तसे ते निश्चितपणे होणारच आहे. कारण त्यापेक्षा वेगळी इच्छा व वेगळी नियती ईश्वराची सुद्धा असणे शक्यच नाही. तेव्हा आता आम्ही सर्व गोकुळवासी तुला अत्यंत प्रेमाने व आनंदाने निरोप देत आहोत. आमच्या सर्व शुभेच्छा तुझ्याबरोबर नित्य असणारच आहेत.

हे कृष्णा, शेवटी एकच मागणे तुझ्यापाशी आम्हा सर्वांसाठी मागून घेते. तुझी ही प्रेमळ मूर्ती सदैव आमच्या हृदयात रहावी आणि तुझ्या प्रेम प्रकाशाने आमचे अंतःकरण नित्य उजळलेले असावे. तुझ्याच रूपाचा ध्यास आमच्याठायी नेहमी असावा, नित्य तुझ्या गुणांचेच गायन आमच्याकडून घडत रहावे. तुझ्या प्रेमाचेच राज्य आमच्याठायी असावे, तुझ्याच भक्तिचे ऐश्वर्य आम्ही नित्य उपभोगावे आणि तुझ्या परमानंद अनुभवातच आम्ही सदैव एकरूप होऊन रहावे.''

कृष्णाच्या प्रेमभक्तिभावाने देहभान हरवलेल्या राधेच्या नेत्रातून प्रेमाश्रूंचे पूर लोटत होते. तिच्या सर्वांगालाच प्रेमाचा मोहरच आल्यासारखे झाले होते आणि एका आनंदाच्या आगळ्या वेगळ्या अनुभवातच ती पूर्णपणे बुडून गेली होती. राधेची ती भक्तिभावपूर्ण अवस्था पाहून सर्वच जण अत्यंत भारावून गेले. कृष्णाच्या मुखकमलावरही त्याच्या अंतःकरणातील सर्व सात्त्विक भाव व स्वानंदाचा पूर्ण अनुभव पूर्णपणे प्रगट झाला होता. आनंदाच्या त्या परमोच्च अवस्थेतच कृष्णाने राधेचे दोन्ही हात धरून तिला प्रेमाने आपल्या जवळ घेतले. सागर व सरिता यांच्या मीलनात कोण कोणास मिळाले हे जसे कळतच नाही परंतु दोघेही एकमेकात मिळालेले असतात, अगदी तसेच राधा व कृष्ण यांच्या ऐक्यभेटीत घडले. एकरूपतेचा अनुभव राधा व कृष्ण या दोघांनीही एकदमच घेतला. कृष्ण हृदयीचे जणु राधेच्या हृदयी गेले आणि राधेच्या हृदयीचे जणु कृष्णाच्या हृदयी गेले.

ते हृदयंगम दृश्य पाहून सर्वांचेच नेत्र भरून आले. विशुद्ध व निर्व्याज प्रेमाचे साकारलेले ते रूप पाहून सर्वांनाच आनंदाचे भरते आले. परंतु राधा व कृष्ण यांची झालेली ही मीलन भेट केवळ बाह्यांगाची नव्हती, तर ती उभयतांच्या अंतःकरणाची होती. त्यामुळेच मथुरेला जाण्यासाठी निघण्याचे व्यवधान जसे कृष्णाच्या ठिकाणी जागृत होते तसेच ते राधेच्या ठिकाणीही होते. म्हणूनच राधा व कृष्ण दोघेही एकदमच बाह्यांगाने एकमेकापासून दूर झाले. दोघांच्याही मुखावर समाधानाचे व तृप्तीचे भाव विलसत होते आणि स्मित हास्य खेळत होते. कृष्ण आता जायला निघणार तेवढ्यात राधेने कृष्णाला हातानेच क्षणभर थांबण्याची खूण केली आणि ती धावतच राजवाड्याच्या आत गेली. सर्वजण नवलाईने व कुतूहलाने तिच्याकडे पहातच राहिले.

थोड्याच वेळात राधा बाहेर आली तेव्हा तिच्या हातात चांदीचे तबक होते आणि त्या तबकामध्ये चांदीचे निरांजन तेवत होते.  राधेने पुढे येऊन ते आरतीचे तबक यशोदेच्या हातात दिले आणि तिला हाताने धरून चालवीत कृष्णाच्या समोर आणले.  यशोदेने तबकातील कुंकुम तिलक कृष्णाच्या भाळी लावला.  त्यावर थोड्या अक्षताही लावल्या आणि बाकीच्या अक्षता कृष्णाच्या मस्तकावर उधळल्या.  त्यानंतर यशोदेने कृष्णाला आरती ओवाळली.  कृष्णानेही त्या आरतीचा दोन्ही हात जोडून व आपली मान लववून स्वीकार केला आणि यशोदेच्या पायांना स्पर्श करून तिला वंदन केले.  यशोदेने आपल्या हातातील तबक राधेच्या हाती दिले.  राधेने आणलेले दही यशोदेने कृष्णाच्या हातावर ठेवले.  कृष्णाच्या परतीची खात्री देणारे ते शुभ शकुनाचे दही कृष्णाने हसून थोडेसे सेवन केले आणि बाकीचे यशोदेच्या मुखात भरवले.  कृष्ण नक्कीच परत येणार अशी मनाशी खात्री बाळगून असलेल्या यशोदेने मग प्रेमभराने कृष्णाला आपल्या कुशीत घेतले.  थोड्या वेळाने मोठ्या प्रयत्नपूर्वक कृष्णाने स्वतःला यशोदेच्या कुशीतून दूर केले.  तबक घेऊन पुन्हा आत जाऊ पाहणाऱ्या राधेला कृष्णाने हाक मारून थांबवले आणि तिलाही ओवाळण्यास सांगितले.  राधेने हसून आपली मान डोलावली आणि ती कृष्णाच्या सन्मुख येऊन उभी राहिली.

राधेने कृष्णाच्या भाळी कुंकुम तिलक व अक्षता लावल्या आणि कृष्णाला आरती ओवाळण्यास सुरुवात केली. निरांजनातील ज्योतीच्या मंद व मंगल प्रकाशात राधा व कृष्ण या उभयतांची मुखे उजळून निघाली होती.  एकाच निरांजनातील तेवणारी ती एकच ज्योत राधेला कृष्णाच्या नेत्रांमध्ये दिसत होती आणि कृष्णाला राधेच्या नेत्रांमध्ये दिसत होती.  राधा व कृष्ण यांच्यामध्ये असलेली ती एकच प्रकाश ज्योत हे जणू त्यांच्यामधील ऐक्यतेचे द्योतक व प्रतीक होते. त्याचा अनुभव राधा व कृष्ण या उभयतांनी घेतला आणि त्याचीच जाणीव त्या उभयतांच्या ठिकाणी उरून राहिली.

राधेने आपल्या हातातील तबक खाली ठेवले आणि कृष्णाच्या चरणांवरती आपले मस्तक ठेवून त्याला भक्तिभावपूर्वक नमस्कार केला.  कृष्णाने तिला आपल्या हाताने उठवले आणि तिच्या पाठीवर व मस्तकावर प्रेमाने थोपटले. राधेने क्षणभरच कृष्णाकडे डोळे भरून पाहिले आणि ती जाण्यासाठी वळणार, तोच उत्स्फूर्तपणे कृष्णाने आपल्या कमरेशी ठेवलेली मुरली काढली आणि अत्यंत प्रेमाने राधेच्या हातात ठेवली.  आश्चर्यचकित पण आनंदित झालेल्या राधेने त्या मुरलीचा आपल्या नेत्रांना व कपाळाला स्पर्श केला आणि त्या मुरलीला आपल्या हृदयाशी धरून ठेवले.  राधा अत्यंत कृतज्ञभावाने कृष्णाकडे पहात होती आणि कृष्ण अतिशय आनंदाने राधेकडे पहात होता.  उभयतांच्या ऐक्यभावाची परमावधीच झाली होती.  आपल्या हातात तबक घेऊन राधा त्या भावपूर्णतेच्या परमावस्थेतच राजवाड्याच्या आत जाण्यास वळली मात्र, कृष्णही त्याच क्षणी राजवाड्याच्या प्रांगणात सुसज्ज करून ठेवलेल्या रथाजवळ आला.

*****

# कृष्णाचे मथुरेकडे प्रयाण

**कृ**ष्णाने बलरामाला हाक मारून आपल्या जवळ बोलावले आणि दोघेही रथात जाऊन बसले. कृष्णाने नेत्रांच्या खुणेने अक्रूरालाही चलण्याचा इशारा केला. अत्यंत जड पावलांनी चालत अक्रूरही रथावरती चढला आणि हातातील लगामाने घोड्यांना इशारा करून त्याने रथ हळुहळू चालवण्यास सुरुवात केली. दुःखाने आर्त झालेले गोप गोपी कृष्णाच्या रथामागून एकेक पाऊल मोठ्या मुश्किलीने ढकलत ढकलत चालत राहिले. यशोदेचे पाऊल मात्र राजवाड्याच्या बाहेर पडूच शकले नाही. ती तेथेच थबकून राहिली आणि कृष्णाची मूर्ती दृष्टी आड होईपर्यंत डोळ्यात सर्व प्राण आणून रथाच्या दिशेने पहात राहिली. नंदाने आणखी पुढे जाण्याचा प्रयत्न केला खरा, परंतु त्यालाही जास्त पुढे जाववेच ना. त्याची पावले व मन दोन्ही एवढी जड झाली की त्याला पाऊल पुढे टाकवेच ना. त्याच्या सेवकांनी त्याला आधार देऊन कसे बसे राजवाड्यात परत आणले.

इतर गोप-गोपींचेही अंगातील त्राण संपत आले आणि अत्यंत नाईलाजाने ते दुःखमग्न अवस्थेतच परत फिरले. अनय व त्याचा आधार घेऊन चालणारा पेंद्या या दोघांनाही परत फिरणे मनाने शक्यच होत नव्हते. पण त्यांच्याही शरीराच्या साथ देण्याच्या मर्यादा या आल्याच. पेंद्याने दोन तीन वेळा 'किस्ना, किस्ना' अशा हाका मारल्या खऱ्या, परंतु कृष्णाने काही मागे वळून पाहिलेच नाही. आपली हाक कृष्णाला ऐकूच गेली नसावी अशी पेंद्याने स्वतःची समजूत करून घेतली आणि मग तोही गप्पच बसला. अनयाने मात्र कृष्णाचा मनोदय ओळखला. कृष्णाच्या मनीची खूण अनयाच्या लक्षात आली आणि तोही जागीच थबकला. पेंद्याची कशी बशी समजूत काढून अनयाने पेंद्याला पुन्हा मागे परतवले आणि धरून धरून चालवत त्याला गोकुळात घेऊन आला.

कृष्णाला रथात बसवून मथुरेला घेऊन जाणाऱ्या अक्रूराची मनःस्थिती मात्र अत्यंत विचित्र झाली होती. एकीकडे कृष्ण आपल्या बरोबर आहे म्हणून त्याच्या मनाला आनंद होत होता. परंतु ज्या परिस्थितीत व ज्या पद्धतीने तो कृष्णाला घेऊन चालला होता, त्यामुळे त्याच्या मनाला अत्यंत दुःखही होत होते. कृष्ण बरोबर असूनही कृष्णाच्या सहवासाचा आनंद अक्रूराला घेताच येत नव्हता. मनाने अजूनही तो मागे गोकुळातच राहिलेला होता आणि म्हणूनच सारखे सारखे मागे वळून पहात होता. रथामागून चालत वा धावत येणारे आणि शोकाकुल झालेले गोपगोपी बघून अक्रूराचे मन वारंवार द्रवत होते. थोडावेळ रथ थांबवावा की काय या विचाराने त्याच्या मनाची द्विधा स्थिती होत होती.

त्याची ही मनःस्थिती ओळखून असलेला कृष्ण, म्हणूनच जेव्हा जेव्हा रथ चालवताना अक्रूर मागे वळून पाही तेव्हा तेव्हा त्याला 'अक्रूरा, अरे पुढे बघून रथ चालव. मागे वळून बघू नकोस. अक्रूरा, आपल्याला त्वरित मथुरेला जायचे आहे हे लक्षात ठेव' अशी वचने बोलून रथ वेगाने चालवण्यासाठी उद्युक्त करीत असे. मग मात्र अक्रूराने बळ घेतले अणि मथुरेच्या दिशेने वेगाने रथ हाकण्यास सुरुवात केली. थोड्यावेळाने रथही दिसेनासा झाला आणि रथाच्या मागून हवेत उडणारा

धुरळाही खाली बसला. सर्व वातावरण पुन्हा शांत शांत व स्तब्ध झाले. जणू काही थोड्या वेळापूर्वी त्या ठिकाणी काहीही घडलेच नव्हते.''

नारदाचा स्वरही बोलता बोलता अगदी हळुवार व गंभीर झाला होता. राधा व कृष्ण यांच्यातील प्रेमरसाने परिपूर्ण अशा भक्तिभावाच्या संबंधातील अत्यंत उत्कट प्रसंग वर्णन करताना नारदाचे अंतःकरणही नारायणाच्या प्रेमाने भरून वहातच होते. कृष्णाच्या गोकुळातील जीवन चरित्राचा जणू कळसाध्यायच नारदाने आपल्या भक्तिगायनाने रचला होता. लक्ष्मीही अगदी तेवढ्याच सहजतेने सगुण प्रेमभक्तिच्या त्या कळसावर पोहोचलेली होती. गोकुळातील प्रगटलेल्या सर्व भावांचा अनुभव लक्ष्मी घेत होती. नंद व यशोदा यांची शोकाकुल अवस्था, गोपगोपींची विरहावस्था, अनय व पेंद्या यांची प्रेमार्त अवस्था आणि राधेची भक्तिभावाची परमतृप्तीची अवस्था या सर्व अवस्थांचा अनुभव लक्ष्मीला एकाच वेळी येत होता. त्यामुळेच ती स्वतःला अत्यंत भाग्यवान समजत होती आणि त्यासाठीच लक्ष्मीच्या ठिकाणचा नारदाविषयीचा सर्व कृतज्ञभाव दाटून आला. तिने जागेवरून उठून नारदाच्या चरणांना स्पर्श करून त्याला नमस्कार केला आणि ती भक्तिभावाने नारायणाच्या जवळ जाऊन बसली. नारायणाकडे अत्यंत प्रेमाच्या व माहात्म्याच्या दाटून आलेल्या भावाने पाहणाऱ्या लक्ष्मीला नारायणाने आपल्या मिठीत घेतले आणि लक्ष्मीही अत्यंत सहजतेने नारायणाच्या कुशीत विसावली. लक्ष्मी व नारायण या प्रेमी युगुलाचे ते मीलन पाहून नारदाचे नेत्रही आनंदाश्रूंनी भरून वाहू लागले आणि नारदाने भक्तिभावाने हात जोडून त्या नारायणाचे दर्शन घेतले.

भावपूर्णतेच्या उत्कट अवस्थेमधून बऱ्याच वेळाने देहभानावर आल्यावरतीही सर्वजण तसेच स्वस्थ बसून होते. कोणीही काहीही बोलण्याच्या अवस्थेत नव्हतेच. पण मग लक्ष्मीला राहवेनाच. देहभानावर आल्यावरही मनाची भावपूर्ण अवस्था तशीच कायम असल्यामुळे लक्ष्मीच्या ठिकाणी सगुण प्रेमभक्तिच्या गायनाची श्रवणतृषा अधिकच लागून राहिली होती. लक्ष्मीच्या ठिकाणी निर्माण झालेल्या भक्तिभावामुळे तिला नारायणाचे माहात्म्य अधिकाधिक जाणवू लागले होते. त्यामुळेच लक्ष्मीची नारायणावरील प्रीतीही आणखीनच वाढली होती. त्यासाठीच नारायणाच्या सगुण अवतारातील कृष्णचरित्राच्या कथा श्रवण करणे लक्ष्मीला अत्यावश्यकच ठरत होते. त्याशिवाय तिच्या मनाला चैन पडणे कदापिही शक्यच नव्हते. म्हणूनच लक्ष्मी नारदाशी विनंतीच्या सुरात बोलू लागली.

*****

## कृष्णरूप राधा

"**हे** भक्तिरूप नारदा, तुझ्या रूपानेच खरे तर सगुण प्रेम व भक्ति ही साकार झालेली आहेत. म्हणूनच तर तू कृष्णचरित्रातील राधा व कृष्ण यांच्या संबंधातील परमोच्च प्रसंग व क्षण अगदी सहजतेने साकार करू शकलास. तुझ्या अंतरंगातील तुझा स्वानुभवच प्रेमाच्या अनेक सुंदर रंगांनी व त्यातील भक्तिभावाच्या विविध अशा सुरेख छटांनी प्रगट होत असताना प्रेम, भक्ती व आनंद या तिन्हीचा अनुभव एकदम व एकाच वेळी येतो. ही किमया जरी नारायणाच्या सगुण प्रेमभक्तिची असली तरी खरा किमयागार तूच आहेस हे अगदी खरे आहे. अशीच आणखीन किमयागिरी तुला अजूनही दाखवायची आहे हे लक्षात ठेव. म्हणूनच आता जास्त वेळ अंतर्मुख होऊन न रहाता तुझ्या अंतरंगातील प्रेमभक्तिचे रंग प्रगट करून माझ्या अंतःकरणाला रंगवायला सुरुवात कर बघू.

हे नारदा, कृष्णचरित्रातील एक महत्त्वाचा टप्पा पूर्ण झाला आणि त्या टप्प्यावरती कृष्ण राधेला मागे गोकुळात ठेवून स्वतः मात्र पुढे म्हणजे मथुरेला निघून गेला. मला वाटते की कृष्ण पुन्हा परत येणार नाही हे राधा व कृष्ण हे दोघेही मनामध्ये पुरेपूर ओळखून होते. जरी दोघांपैकी शब्दाने कोणी बोलले नाही, तरी या पुढे एकमेकांची पुन्हा भेट नाही हे त्यांच्या लक्षात आलेलेच असणार. म्हणून तर जणू शेवटच्या भेटीसारखी उत्कटता राधा व कृष्ण या दोघांच्या ठायी अगदी आतून आलेली होती. सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे ती दोघे उत्कटतेने, पण अगदी सहजतेने वागत होती. कुठेही भावनेचा अतिरेक व उद्रेक नव्हता. अगदी मोकळेपणाने त्यांनी परस्परांच्या प्रेमाचा अनुभव घेतला आणि एकमेकांना आपल्या हृदयात कायमपणे घेतले. या आंतरिक ऐक्यतेच्या अनुभवाचे मला खरेच अप्रूप वाटते. पण तरीही बाह्यांगाने दोघांची भेट पुन्हा झालीच नाही आणि तशी ती होणारही नव्हती याचे मनाला थोडे तरी वाईट वाटतेच. विरह व मीलन या दोन्ही अवस्थांच्या पलीकडे असलेली ही एकरूपतेची अवस्था अनुभवाशिवाय कळणे कठीणच असले, तरी त्या अवस्थेविषयीचे नुसते कुतूहल वाढते असे नव्हे, तर ती अवस्था अनुभवण्याचा ध्यासच लागतो.

हे नारदा, कृष्ण गोकुळ सोडून मथुरेला गेल्यावरती त्याचे पुढे केवढे तरी जीवन घडले असेल. कंसाचा वधही त्याने केला असेल आणि स्वतःच्या मातापित्यांनाही त्यांने कंसाच्या बंदीवासातून नक्कीच सोडवले असणार याचीही मला पूर्ण खात्री आहे. कृष्णाकडून आणखीन कितीतरी पराक्रमही घडलेच असणार. कृष्णासाठी त्याचे सारे जीवन त्याच्यापुढे होते. ते सर्व श्रवण करण्याची मला तर अत्यंत उत्सुकता लागलेली आहे. कारण गोकुळात तर त्याचे केवळ बालपणच गेले. अर्थात कृष्णाच्या गोकुळातील जीवनाला त्याची बाल्यावस्था असे म्हणता येणेच शक्य नाही. कारण कृष्ण तर तेथे अगदी परिपूर्ण जीवन जगला. त्याच्यामध्ये अपूर्णता अशी कधी व कोठेही जाणवलीच नाही. जो काही अनुभव कृष्णाने घेतला तो अत्यंत पूर्ण अनुभवच होता. तरीही जीवनातील बाह्यांगाच्या तारुण्य, प्रौढ या अवस्थांमध्ये त्याचे जीवन कसे प्रगट झाले आणि त्याने त्याच्या ठायीचे पूर्णत्व कसे अनुभवले हे जाणून घेणे माझ्या दृष्टीने मला अत्यंत महत्त्वाचेच वाटते. परंतु

गोकुळातील कृष्णाच्या जीवनाची सर त्याच्या पुढील जीवनात आली असेल का, हीही एक समजून घेण्यासारखी गोष्ट मला वाटते.

हे नारदा, परंतु माझे मन अजूनही राधेपाशीच गुंतलेले आहे. राधेचे पुढील जीवन कसे गेले असेल बरे? एवढ्या वर्षांचा कृष्णाचा सहवास एका क्षणात संपला ही काही साधी गोष्टच नाही. त्याचा परिणाम राधेवर काही तरी झालाच असेल की नाही? राधेच्या अंतःकरणात कृष्णाची मूर्ती आहे आणि तेथे कृष्णाशी ऐक्यतेचा अनुभवही आहे, हे सर्व बरोबर आहे आणि खरेही आहेच. परंतु बाह्यांगाचा विरह हा राधेला जाणवला असणारच की नाही? अंतरातील कृष्णप्रेमाचा अनुभव बाह्यांगानेही घेणे राधेला आवश्यक झालेच असणार. अशा वेळी बाह्य परिस्थितीची प्रतिकूलता तिला नक्कीच जाणवली असणार. मग राधेने ते कृष्णप्रेम कसे बरे अनुभवले असेल, याची काळजी तर मलाच जास्त वाटत आहे.

आणखीन एक नवलाईची गोष्ट म्हणजे कृष्णाने मथुरेला जाताना स्वतःची मुरली राधेला दिली होती. पण राधेला मुरली कुठे वाजवता येत होती? कृष्णाने राधेला मुरली वाजवायला तर कधी शिकवलेले नव्हतेच. मग राधेला त्या मुरलीचा उपयोगच काय? का केवळ कृष्णाची एक स्मृती म्हणूनच राधा ती मुरली जपून ठेवणार होती? आणि समजा राधेला मुरली वाजवता येत असती तरी ती काय सर्वांना मुरली वाजवून थोडीच दाखवणार होती? कारण ती तर मग कृष्णाची नुसती नक्कलच ठरली असती, नाही का? आणि राधा तर तसे करणे कधीही शक्यच नाही. मग राधेने त्या मुरलीचे केले तरी काय? त्याहीपेक्षा, राधेचे पुढील जीवन जे ती आनंदाने जगली असेल, त्यात त्या आनंदाला जीवनात तिने कसे अनुभवले?

मला वाटते कृष्णापेक्षा राधेचे जीवन बाह्यांगाने जरी मर्यादित दिसत असले तरी आनंदाचा अनुभव बाह्यांगाने घेण्यासाठीही तिचे जीवन मर्यादित होते आणि म्हणूनच कठीणही होते. त्यासाठीच हे नारदा, आधी मला तू कृष्ण मथुरेला गेल्यानंतर गोकुळात काय घडले ते सांग. नंद व यशोदा यांनी स्वतःला कसे सावरले? अनय, पेंद्या व इतर गोपगोपी या त्यांच्या शोकाकूल अवस्थेतून बाहेर आल्या की नाही? आल्या असल्यास कशा आल्या? या सर्वांपेक्षा राधेने या सर्वांसाठी काही केले का? कारण 'राधेच्या रूपाने मीच आता गोकुळात राहणार आहे' असे वचन तर कृष्णच बोलून गेला होता. नारदा, हे सर्व सर्व ऐकण्यासाठी माझे अंतःकरण अगदी व्याकुळ होऊन राहिलेले आहे. तरी कृष्णचरित्रातीलच, पण कृष्णाच्या अनुपस्थितीत गोकुळात सगुण प्रेमभक्तिमाहात्म्य कसे टिकून राहिले आणि ते कसे प्रगट होत राहिले याचे वर्णन करून नारदा, माझ्या व्याकुळतेचे शमन कर. त्या शिवाय माझ्या मनाला चैनच पडणार नाही.''

लक्ष्मीची व्याकुळ अवस्था पाहून नारदाला एक प्रकारचे समाधानच वाटले. कारण प्रेमाच्या अनुभवाच्या तृप्तीनंतर पुन्हा व्याकुळता हे त्या भक्तिभावाचेच लक्षण आहे हे नारद स्वानुभवाने जाणून होता. म्हणूनच राधेच्या भक्तिभावाच्या अनुभवाचे वर्णन करण्यास नारदही लक्ष्मी एवढाच आतुर झाला होता. लक्ष्मीने तळमळीने विचारलेल्या प्रश्नांमुळे नारदाच्या ठिकाणची आर्तता अधिक वाढली एवढेच. त्यामुळे लक्ष्मीच्या प्रश्नांचे निमित्त घेऊन नारदाने लागलीच बोलावयास सुरुवात केली.

‘‘हे लक्ष्मी, कृष्ण मथुरेला गेल्यानंतर राधेने तिचे जीवन कसे जगले आणि तिने जीवनात आनंदाचा अनुभव कसा घेतला हे जाणून घेण्याची तुझी तळमळ अगदी योग्यच आहे. कारण कृष्ण आता बाह्यांगाने प्रत्यक्ष नसतानाच राधेची खरी कसोटी होती आणि राधेचा खरा कस आताच लागणार होता, असाच विचार तुझ्या मनात आला असणार. परंतु प्रत्यक्षात राधेला मात्र अशी कोणतीच अडचण जाणवली नाही. कारण अनुभवाने तिच्या ठिकाणी एका गोष्टीचा पक्का निश्चय झाला होता, की जीवनात काही वेगळा आनंद अनुभवायचाच नाही. मुद्दाम म्हणून काही जीवनात आनंद घ्यायला गेले तर तसा आनंद अनुभवताच येणार नाही. कारण आनंदाचा अनुभव ही अंतःकरणाची स्थिती आहे. म्हणूनच जीवनात आनंद अनुभवायचा नसून, अंतःकरणातील आनंदाच्या अनुभवानेच जीवन जगायचे आहे.

अंतःकरणात पूर्ण तृप्ती, मनामध्ये अत्यंत शांती व समाधान, वागण्या-बोलण्यात मोकळेपणा व सहजता आणि जीवनात घडणाऱ्या गोष्टींच्या परिणामाचे न होऊन राहणे हीच लक्षणे मुख्यतः अंतःकरणातील आनंदाच्या अनुभवाच्या स्थितीची आहेत. अशीच राधेच्या अंतःकरणाची स्थिती कृष्णाच्या भक्तिने झालेली होती. कृष्णाच्या सहवासात कृष्णाचे ईश्वरी प्रेम अनुभवताना राधेच्या ठिकाणी त्या ईश्वरी प्रेमाची धारणा केव्हा व कशी झाली हे तिलाही कळले नाही. पण राधेच्या जेव्हा ते लक्षात आले तेव्हा मात्र त्या ईश्वरी प्रेमाचे राधेने काळजीपूर्वक जतन केले आणि ते प्रयत्नपूर्वक वाढवले. त्या ईश्वरी प्रेमाची अशा तऱ्हेने निश्चिती झाल्यावर ते प्रेम राधा जेव्हा भक्तिभावाने कृष्णालाच अर्पण करू लागली तेव्हाच राधेच्या ठायीचे ईश्वरी प्रेम सबळ व सुदृढ होऊ लागले. आता कृष्णाचा बाह्यांगाचा सहवास व भेट होऊ शकणार नाही, तरीही अंतःकरणातील कृष्णाचे ईश्वरी प्रेम कायम आहे याची प्रचिती घेण्याचीच वेळ व संधी राधेच्या जीवनात आलेली होती. अंतःकरणात ठसलेली कृष्णाची मूर्ती आणि कृष्णाच्या ईश्वरी प्रेमाची प्रचिती यांच्या ऐक्यातूनच राधेला आनंदाची अनुभूती येणार होती. त्या अनुभूतीनेच राधेचे पुढील सर्व जीवन सहजपणे घडत गेले.

हे लक्ष्मी, कृष्णाला ओवाळून झाल्यावरती आणि कृष्णाने दिलेल्या मुरलीच्या रूपातील प्रेमभेटीचा स्वीकार करून आनंदित झालेली राधा हातातील तबक ठेवण्यासाठी देवघरात गेली. तेथे तिने देव्हाऱ्यातील मूर्तीसमोर हातातील आरतीचे तबक ठेवले. दोन्ही हात जोडून राधेने श्रद्धापूर्वक त्या मूर्तीला नमस्कार केला. थोडा वेळ ती तेथेच डोळे मिटून उभी राहिली. परमेश्वराच्या व्यापक अस्तित्वाचे प्रतीक असलेल्या त्या मूर्तीसमोर तिने कृष्णाच्या स्वास्थ्यासाठी व यशासाठी प्रार्थना केली. क्षणात राधेचे डोळे प्रेमाश्रूंनी भरून आले. पण राधेने लगेचच स्वतःला सावरले आणि ती लगबगीने पुन्हा बाहेर आली. बाहेर येऊन पहाते तो काय, कृष्ण रथात बसून निघून सुद्धा गेला होता. पण राधा जरा सुद्धा नाराज झाली नाही किंवा कृष्णाच्या रथाच्या मागोमाग जाण्याचा विचारही तिच्या मनात आला नाही. कृष्णाच्या स्वभावातील तातडी करण्याचा गुण स्वानुभवाने माहीत असलेल्या राधेला, कृष्णाच्या असे त्वरित निघून जाण्याच्या कृतीची गंमतच वाटली.

त्यानंतर शोकाकूल अवस्थेतील यशोदेला राधेने पाहिले आणि तिच्या ठिकाणी यशोदेविषयी कळवळा निर्माण झाला. राधा लगेचच यशोदेच्या जवळ गेली. तिने प्रथम यशोदेला थोडेसे पाणी आपल्या हाताने पाजले. यशोदा थोडीशी सावरली

आहे असे पाहून राधेने तिला सांभाळून चालवत चालवत यशोदेच्या शयनगृहात नेले. राधेने लगबगीने थोडेसे दूध स्वतः गरम करून आणले आणि ते यशोदेला थोडे थोडे पाजले. यशोदेला थोडीशी हुषारी आलेली पाहून राधेने तिला पलंगावर निजवले आणि तिच्या अंगावर उबदार पांघरूणही घातले. राधा यशोदेच्या उशाशी तिचे डोके हळुवार हाताने थोपटीत राहिली. थोड्या वेळाने यशोदेचा डोळा लागला आहे असे पाहून राधा तेथून उठली आणि नंदाच्या दालनात गेली. नंदालाही राधेने गरम दूध आग्रह करून प्यायला लावले आणि त्याचे पाय दाबीत ती तेथेच बसून राहिली. नंदाचे शारीरिक व मानसिक स्वास्थ्य परत आलेले पाहून राधा तेथून उठून बाहेर आली, तो तेवढ्यातच तेथे अनय व पेंद्या यांचे आगमन झाले. पेंद्याची ती दुःस्थिती बघून राधेचे मन द्रवले आणि तिने पुढे होऊन पेंद्याला आपल्याजवळ घेतले. तिच्या कुशीत मुसमुसून रडणाऱ्या पेंद्याला राधेने प्रेमाने थोपटून थोपटून थोडेसे शांत केले. पेंद्याला थोडेसे पाण्याने ताजे तवाने केले आणि त्यालाही थोडेसे गरम दूध पाजले. थकलेल्या अनयालाही तिने आधी बसून थोडी विश्रांती घेऊ दिली आणि मग त्यालाही गरम दूध देऊन त्याचा थकवा थोडासा दूर केला.

राधेने त्या नंतर एकंदर परिस्थितीचा अंदाज घेतला आणि राजवाड्यावरील दासदासींना नंद व यशोदेच्या संबंधी काही सूचनाही केल्या. सर्व काही व्यवस्थित आहे याची स्वतः खात्री करून घेतल्यावर मग राधेने अनयाला घरी चलण्याविषयी सांगितले. मगाच पासूनचे राधेचे वागणे, बोलणे व वावरणे पाहून अनयाला जरा नवलच वाटत होते. कारण राधेच्या ठिकाणी दुःख, नैराश्य वा उदासीनता याचा लवलेशही दिसत नव्हता. प्रत्येक गोष्ट ती सहजपणे व निश्चयाने करीत होती. अशा राधेला पाहून तर अनयाला तिची काळजीच वाटली. कारण त्याला वाटले, राधा प्रयत्नपूर्वक तिचे दुःख मनात दाबून ठेवत असावी. राधा जर वेळीच तिच्या दुःखातून मोकळी झाली नाही, तर तिलाच अत्यंत मानसिक त्रास होईल अशा राधेविषयीच्या काळजीपोटी अनयाने राधेचे सांत्वन करण्याचा प्रयत्न केला. राधेने अनयाला 'मी ठीक आहे. माझी काळजी करू नका' असे निश्चयपूर्वक सांगितल्यावर अनयही थोडासा चकितच झाला, पण मग तो काहीही बोलला नाही. नंदाच्या व यशोदेच्या साठी आपण दोघांनी आज वाड्यावरच थांबावे असे मात्र अनयाला अगदी मनापासून वाटत होते. परंतु राधेने 'नंद व यशोदा आता व्यवस्थित आहेत. घरी सासूबाईसुद्धा एकट्या आहेत. त्याही दुःखीच आहेत. त्यांच्यासाठी घरी लवकरच जायला हवे' असे अनयाला थोडेसे निक्षूनच सांगितले. मग अनयाचाही नाइलाज झाला आणि तो राधेसह घरी जाण्यासाठी निघाला. राधेने पेंद्यालाही त्यांच्याबरोबर घेतले. पेंद्याचा हात धरून त्याला हळुहळू चालवीत त्याच्या घरी पोचते केले आणि राधा व अनयही धिम्या गतीने चालत त्यांच्या घरी पोहोचले.

राधेने घरी पोहोचल्यावर प्रथम सासूबाईंची चौकशी केली. त्यांचेही सांत्वन करून त्यांनाही आग्रहाने थोडेसे गरम दूध प्यायला दिले. दमून व थकून आलेला अनय ताबडतोब स्नान करण्यास गेला. तोपर्यंत राधा स्वयंपाक घरात जाऊन लगबगीने स्वयंपाकाच्या तयारीस लागली. मोजके व आवश्यक तेवढेच पदार्थ तिने शिजवले आणि अनय व सासूबाई यांना बळेबळे तरी चार घास खाऊ घातले. त्यांची जेवणे होईपर्यंत राधेने देवघरातील देव्हाऱ्यात समईची तेलवात व निरांजनातील तूपवात लावली. कृष्णाने दिलेली मुरली तिने देव्हाऱ्यातच ठेवली. बराच वेळ ती मूर्तीसमोर हात जोडून व डोळे मिटून

बसली होती. राधेने तिचे नेत्र मिटले मात्र, ते भरून वाहण्यास जराही वेळ लागला नाही. अनय व सासूबाई यांची जेवणे झाल्यावरती राधेने स्वतःही अल्पोपहार घेतला. सर्व आवराआवर करून राधा तिच्या खोलीत आली आणि शांतपणे अंथरुणावर अनयाच्या शेजारी पहुडली. अनयही स्वस्थपणे पडलेला होता. कोणीही कोणाशी बोलत नव्हते. कोणीही कोणाला काही विचारत नव्हते आणि कोणीही कोणाला काही सांगतही नव्हते. दोघांचेही डोळे मिटलेले होते खरे, परंतु त्यांना झोप लागणे शक्य नव्हते. अनयाच्या ठिकाणी कृष्णाच्या प्रेमाच्या स्मृती जाग्या झाल्या होत्या म्हणून त्याला झोप नाही, तर राधेच्या ठिकाणचा कृष्णच जागा होता आणि राधेच्या मनाला त्याच्या प्रेमाने रंगवीत होता. कृष्ण प्रेमरंगात पूर्ण रंगलेली राधा अंतरंगात कृष्णप्रेमातच रममाण होऊन राहिली होती. त्या ठिकाणी स्थळ, काळ व वेळ या सर्वांची गणतीच पूर्णपणे थांबलेली होती.

दुसऱ्या दिवशी भल्या पहाटेच नेहमी प्रमाणे राधा अंथरुणातून उठली आणि आपल्या नित्याच्या कामाला सहजपणे लागली. रात्रीच्या जागरणाचा काहीही परिणाम राधेवर झालेला नव्हता. ती नेहमी इतकीच ताजीतवानी व उत्साही होती. अनयाला मात्र रात्रीच्या जागरणानंतर पहाटे पहाटे डोळा लागला असावा. राधेने ते ओळखले आणि म्हणून तिने अनयाला मुद्दामहून जागे केले नाही. थोड्यावेळाने अनय जागा झाला आणि त्याने राधेचा कानोसा घेतला. पण राधा कोठेही जवळपास दिसली नाही. म्हणून उठून अनय राधेला शोधू लागला, तर त्याला राधा अंगणात तुळशी वृंदावनासमोर भक्तिभावाने हात जोडून उभी असलेली दिसली. अनयाला थोडेसे नवल वाटले आणि तो अंगणात आला. तेथे त्याने पाहिले, की राधेने अंगणात आधीच सडासंमार्जन केले होते आणि तुळशी वृंदावनासमोर सुरेखशी रांगोळीही काढली होती. अनयाने कुतूहलाने पुढे येऊन पाहिले. राधेने त्या रांगोळीमध्ये कृष्णाच्या मुखकमलाचे सुंदर व रंगीत चित्र काढलेले होते आणि त्याखाली **'कृष्ण सखा'** असे सुरेख अक्षरात लिहिलेले होते.

अनयाच्या येण्याची चाहूल लागताच राधेने अनयाचे प्रेमाने हसून स्वागत केले आणि त्याच्या स्वास्थ्याची चौकशी केली. राधेने अनयाला लवकर आंघोळ करून घेण्याविषयी सांगितले आणि ती स्वतः अनयासाठी न्हाणीघरात गरम पाणी ठेवण्यासाठी लगबगीने घरात गेली. राधेच्या वागण्यातील सहजता व मोकळेपणा बघून अनय एवढा चकित होऊन राधेकडे पहातच राहिला, की त्याला राधेच्या स्वास्थ्याची चौकशी करण्याचे सुचलेच नाही.

अनय आपली आंघोळ आटपून आला तेव्हा राधा देवघरात देवाच्या मूर्तीसमोर पूजा करीत बसली होती. तेथेही तिने सुरेख रांगोळी काढून त्यामध्ये **'कृष्ण सखा'** असे लिहिलेले होते. अनयसुद्धा जेव्हा देवघरात आला तेव्हा राधेने त्याच्या हातावर आधी पूजेचे तीर्थ ठेवले आणि अनयाने ते प्राशन केल्यावरती त्याच्या हातावर लोणीसाखरेचा प्रसाद ठेवला. अनयाने त्या प्रसादाचे भावाने सेवन केले. एवढे सर्व करूनही अनयाला सुन्न सुन्नच वाटत होते. रोज सकाळी कृष्णाला प्रेमाने जाऊन भेटण्याचा अनयाचा नेमच होता. पण आज काय करावे हे त्याला सुचेचना. परंतु 'नंद व यशोदा यांची तरी भेट घेतलीच पाहिजे आणि त्यांची ख्याली खुशाली विचारून त्यांची काही तरी सेवा केलीच पाहिजे' असा विचार अनयाच्या

मनात आला. तो विचार त्याने राधेला सांगितला आणि 'आपण दोघेही राजवाड्यावर जाऊया' असेही सुचविले. त्यावर राधा अनयाला 'तुम्ही जाऊन या. लवकर जेवणापर्यंत या. मी तुमची वाट बघते' एवढेच म्हणाली आणि स्वस्थ बसली. अनयाला पुन्हा राधेचे नवल वाटले. 'तिला आता राजवाड्यावर यावेसे का बरे वाटत नाही?' असाही विचार अनयाच्या मनात आला. परंतु त्याचा जास्त विचार न करता अनय स्वतः मात्र लगबगीने घराबाहेर पडला.

अनयाचे घराबाहेर जाणे होते न होते, तो तेवढ्यातच पेंद्या तेथे धावत धावतच आला. दुःखी व म्लान चेहरा झालेल्या पेंद्याचे राधेने हसून स्वागत केले आणि पेंद्याची ख्याली खुशाली विचारली. त्यावर पेंद्या रडवेल्या सुरात राधेला म्हणाला,

''अगं राधे, रात्रभर कृष्णाच्या आठवणीने जागाच होतो. थांबवण्याचा पुष्कळ प्रयत्न करूनही माझे रडे कसे ते थांबतच नव्हते. शेवटी रडून रडून दमलो म्हणूनच पहाटे थोडीशी ग्लानी आली. पण सकाळी सुद्धा 'गुरे चरण्यासाठी घेऊन कृष्णाच्या बरोबर जायचे आहे' या विचाराने एकदम दचकून जागा झालो. पण आज कृष्ण नाही या स्मरणाने मन उदासीन झाले. कशातच लक्ष लागेना. गुरांना चरायला नेणे व त्यांची राखण करणे मग राहूनच गेले. थोड्या वेळाने राधे, एकदम तुझी आठवण झाली. वाटले की तू कृष्णाच्या एवढी प्रेमाची, नित्य त्याचा सहवास करणारी, मग कृष्णाच्या जाण्याचा तुला किती बरे त्रास झाला असेल? तेव्हा आपण दोघेही समदुःखी आहोत म्हणून तुला भेटावे आणि बोलून आपल्या दोघांचेही दुःख जरा तरी हलके करावे असे वाटून तुझ्याकडे धावत आलो. पण येथे बघतो तो काय? तू माझे हसत मुखाने स्वागत करीत आहेस आणि खुशाल मला 'तू खुशाल आहेस ना?' असे विचारीत आहेस. मला तरी हे सर्व नवलच वाटते बुवा! राधे, कृष्णाच्या जाण्याचे तुला अजिबात दुःख झाले नाही असे होणेच शक्य नाही. मग तू एवढी शांत व स्वस्थ कशी? आणि हसत मुखाने तुझे सर्व व्यवहार तू व्यवस्थित करीत आहेस हे कसे काय? मला तरी हे काहीच कळत नाही.''

पेंद्याच्या विचारण्याला काही उत्तर देण्याच्या आधी राधेने प्रथम त्याला आतल्या खोलीत नेऊन एका आसनावर बसवले आणि त्याला पिण्यासाठी पाणी दिले. त्यानंतर राधेने त्याला दूध व थोडीशी फळे दिली. आदल्या दिवसापासूनच कृष्णाच्या जाण्यामुळे शोकाकूल झालेला पेंद्या काही न खाता पिता तसाच भुकेला राहिला होता. राधेने दिलेला फलाहार सेवन करून, त्याहीपेक्षा राधेच्या आपलेपणामुळे पेंद्याचे पोट व मन दोन्ही भरले. अशा तऱ्हेने ताजातवाना झालेल्या पेंद्याशी मग राधा बोलू लागली.

''अरे पेंद्या, कृष्णाच्या स्मरणाने तुला अत्यंत वाईट वाटणे साहजिकच आहे. परंतु तू असे व एवढे शोकाकूल व निराश होणे मात्र योग्य नव्हे. अरे, कृष्णाचे प्रेम एवढा काळ अनुभवलेस ना? मग त्याचेही स्मरण आता कर ना. कृष्णाच्या प्रेमाचे स्मरण तुला झाले, की मग त्याचे सांगणेही तुला नक्कीच आठवेल. पेंद्या, कृष्ण आपल्या सर्वांना सतत काय बरे सांगत असे? तर प्रथम आपले कर्तव्यकर्म नेहमी योग्य प्रकारे पार पाडायलाच सांगत असे, नाही का? आपल्या कर्तव्यकर्मात चुकारपणा केलेला जर त्याला कधीच आवडत नसे, तर मग आज तू तुझे कर्तव्यकर्म का केले नाहीस आणि

गुरांना रानात चरायला घेऊन का गेला नाहीस? तुझे हे वागणे कृष्णाला आवडले असते का? नाही ना? पूर्वी आपल्याला आपले कर्तव्यकर्म सांगायला कृष्ण स्वतः होता. परंतु आता तो नाही म्हटल्यावर आपले कर्तव्यकर्म आपणच समजून करण्याची आपली जबाबदारी अधिकच वाढली नाही का?

आपल्याला कृष्णाचे खरे स्मरण असेल, तर आपल्याकडून आपले कर्तव्यकर्म सहजपणे घडेल आणि जेव्हा आपल्याकडून आपले कर्तव्यकर्म घडेल तेव्हा आपल्याला आपल्या कृष्णाचे स्मरणही तेवढ्याच सहजतेने होईल. तेव्हा पेंद्या, एक गोष्ट लक्षात ठेव, की आपण कृष्णाचे स्मरण नेहमीच आपल्या ठिकाणी ठेवायचे आणि मग त्याच्या सांगण्याचे स्मरण करायचे. कृष्णाला अपेक्षित असे वागणे आपल्याकडून घडले की आपल्या ठिकाणचे कृष्णप्रेमही नित्य जागे राहील. त्याचे विस्मरण आपल्याला कधीच होणार नाही. त्यामुळे मग आपले मन नेहमी शांत व उत्साही राहील आणि आपले जीवन आपल्याला समाधानाने जगता येईल.

अरे पेंद्या, मी सुद्धा आता माझे जीवन कृष्णस्मरणानेच जगते आहे. म्हणूनच मी शांत, समाधानी व आनंदात असल्याचे तुला दिसत आहे आणि तुला त्याचे नवलही वाटताना दिसत आहे. परंतु हा मोठेपणा माझा नाही, तर तो कृष्णप्रेमाचाच पराक्रम आहे. कृष्ण आपल्याला या पुढे भेटणार नाही म्हणून दुःख करीत बसलो तर आपले दुःख वाढेलच. पण त्या ऐवजी कृष्णाच्या सहवासात असताना आपल्याला काय मिळाले आणि त्या पैकी आपल्या ठिकाणी आता काय उरले याचा विचार जर आपण केला, तर आपले मन हलके होईल आणि त्या मनाचे बळ वाढेल. कृष्णाची व आपली भेट मोठ्या भाग्याने झालेली होती आणि त्याचा सहवास व प्रेमही आपल्याला मिळाले होते. आपल्यासारखे खरे भाग्यवान आपणच. पण त्यातील जर आता आपल्या ठिकाणी काहीही शिल्लक राहिले नसेल, तर मग आपल्यासारखे कमनशिबीही आपणच ठरू. तेव्हा कृष्णाने जे जे काही आपल्याला अत्यंत प्रेमाने दिले ते आपण प्रयत्नपूर्वक राखले पाहिजे आणि कृष्णाने आपल्याला काय दिले, तर मनाचा मोकळेपणा, आपले जीवन जगण्याचे बळ आणि आनंदाने जीवन जगण्याची वृत्ती. हो की नाही? पेंद्या, मी जे काय सांगत आहे ते तुझ्या लक्षात येत आहे ना?''

राधेच्या बोलण्याने पेंद्याच्या मनाला पुन्हा थोडीशी उभारी आली. त्याने थोडेसे हसून आपली मान डोलवली आणि तो राधेला म्हणाला, ''राधे, तुझे म्हणणे अगदी बरोबर आहे. अगं, तुझे बोलणे व सांगणे अगदी कृष्णासारखेच आहे. मला तर थोडावेळ कृष्णच माझ्याशी बोलतो आहे की काय असे वाटले. तोच आपलेपणा, तोच जिव्हाळा, तीच कळकळ आणि तेच मोकळेपणाचे व निश्चयात्मक बोलणे. राधे, तुझ्या ठिकाणी कृष्णाचे सर्व सांगणे एवढे कसे काय ठसून राहिले बुवा? मला तर त्याचे अगदी नवलच वाटत आहे. कृष्णाचे स्मरण तर मला सतत होत आहे. परंतु त्याने काय काय सांगितले ते मात्र मला तेवढेसे आठवत नाही. आताच्या तुझ्या सांगण्यामुळे मला थोडे थोडे आठवू लागले.

राधे, कृष्णाचा खरा सहवास तूच केलास आणि त्याचे खरे प्रेमही तूच अनुभवलेस याची माझी पक्की खात्री झाली आहे. मला आपला कृष्ण अत्यंत आवडत होता. कारण तो माझे कौतुक व लाड करीत असे. खरे प्रेम कृष्णाचेच

माझ्यावरती होते.  म्हणूनच तो माझी नेहमी काळजी घेत असे आणि मला माझ्या हिताच्या गोष्टी सांगत असे.  'पेंद्या, मनाने दुर्बळ राहू नकोस. सबळ हो' असे कृष्ण मलाही वारंवार सांगत असे.  पण त्यावेळेस मी त्याच्या बोलण्याकडे तेवढेसे लक्षच दिले नाही.  'कृष्ण आपल्या बरोबर असताना आपण कशाला काळजी करायची' असाच मी विचार करून स्वस्थ बसत असे.  पण कृष्ण आता नाही म्हटल्यावर मात्र माझ्या मनातील मूळची दुर्बलावस्था बाहेर आली आणि तिने माझ्या मनाला पूर्णपणे ग्रासून टाकले.  त्यामुळेच मी हतबल झालो व हवालदिल झालो.

त्यातल्या त्यात एक बरे झाले, की दुसऱ्या कोणाकडेही न जाता मला तुझ्याचकडे येण्याची बुद्धी झाली आणि मी रडत रडत का होईना, पण तुझ्याचकडे धावत आलो.  तुझ्या बोलण्यामुळे मला केवढा तरी आधार मिळाल्यासारखे वाटले आणि माझे मनही बरेचसे शांत झाले आहे.  तू सांगितल्याप्रमाणे मी उद्यापासून गुरांना चरण्यासाठी नक्की घेऊन जाईन. राधे, मला तुला आणखीन एक गोष्ट विचारायची आहे.  मी तुला असे मधून मधून येऊन भेटलो तर चालेल का?  मला तरी तुझ्याशिवाय आता दुसऱ्या कोणाचा आधार मिळणार आहे आणि तुझ्यासारखा आधार मला तरी दुसरा कोण देणार आहे? राधे, फक्त तुलाच ते शक्य आहे.  कारण तू केवळ कृष्णाचे प्रेम घेतले नाहीस, तर कृष्णावरती केवढेतरी प्रेम केलेले आहेस. हे मला पक्के ठाऊक आहे.  अनेक प्रसंगांना मीसुद्धा साक्षी होतोच की.  त्यामुळे माझ्या सारखे ज्यांनी कृष्णाचे नुसते प्रेमसुख घेतले ते मनाने दुर्बलच राहिले.  कृष्णाच्या स्मृतीचा आधार मी घेऊ पहातो.  म्हणूनच मग कृष्ण माझ्यापासून केवढा तरी दूर आहे असे जाणवते आणि माझे दुःख व दुर्बलता अधिकच वाढते.

पण राधे, तू मात्र कृष्णावरती खरे प्रेम केलेस.  त्या प्रेमापोटी व त्या प्रेमासाठी केवढा तरी त्याग तू केलास.  केवढे तरी कष्ट सहन केलेस, केवढे तरी मनाचे क्लेश सहन केलेस आणि केवढ्या तरी निंदेलाही धैर्याने तोंड दिलेस.  म्हणूनच तू आज त्या कृष्णाच्या प्रेमाने युक्त होऊन राहिली आहेस आणि त्या कृष्ण प्रेमाचे सर्व गुण अगदी सहजपणे तुझ्या अंगी बाणलेले आहेत.  तेव्हा कृष्ण आता नाही या दुःखापेक्षा त्याने तुला माझ्यासाठीच येथे ठेवलेले आहे याचा मला आधार आहे आणि त्याचाच मला आनंद आहे.  तेव्हा जसे जसे मला जमेल तसा तसा मी तुझा सहवास करीत राहीन.  तुझ्याशी बोलत राहीन आणि तुझ्या प्रेमाचा अनुभव घेत राहीन.  चालेल ना, राधे?''

पेंद्या बोलता बोलता भावनात्मक झाला होता.  त्याच्या डोळ्यात अश्रू आणि बोलण्यात अजिजी व आर्जवीपणा आला होता.  राधेने प्रेमाने पेंद्याच्या डोक्यावर थोपटले आणि हसून जरा गंमतीने म्हणाली,

''अरे पेंद्या, चालेल काय तर नुसते धावेल!  तुझीही अगदी कमाल आहे.  माझ्याकडे येण्यासाठी व मला भेटण्यासाठी तुला परवानगीची काय आवश्यकता आहे?  अरे, आतापर्यंत तशी जरुरी कधी तुला वाटली नाही.  मग तशी जरुरी तुला आताच का वाटत आहे बरे?  अरे, तो तर तुझा हक्कच आहे.  केव्हाही येत रहा.  पण येऊन जायचे आहे, रहायचे नाही, एवढे मात्र लक्षात ठेव हं!  अरे, कृष्णाचा तू एवढा आवडता मित्र.  मग तुला भेटायला मलाही नक्कीच आवडणार, नाही का?  पण पेंद्या, गुरे राखण्यासाठी उद्यापासून जाणार असे का म्हणतोस?  उद्या काय खास मुहूर्त आहे

का? अरे, आपल्या मनात काही करण्याचा चांगला विचार आला रे आला, की तीच वेळ चांगली आहे असे समजून ती गोष्ट लगेचच करावी. तेव्हा उद्याची वाट पहात न बसता तू आजच व आताच नीघ बघू. मी तुला बरोबर शिदोरी देते. ती तू घे आणि तुझ्या घरचे कोणी गुरांना घेऊन रानात गेले असेल त्यांना तेथेच जाऊन भेट आणि त्यांना जमेल तशी व तेवढी मदत कर.''

असे म्हणत म्हणत व हसत हसत राधा घराच्या आत जवळ जवळ पळतच गेली. पेंद्या मात्र आधी बराच वेळ राधेकडे चकित होऊनच पहात राहिला आणि नंतर पेंद्यालाही हसू येऊ लागले. थोड्याच वेळात राधेने शिदोरी बांधून पेंद्याच्या हातात दिली. निघण्यापूर्वी राधेने पेंद्याला देवघरात नेले आणि पेंद्याला मूर्तीसमोर नमस्कार करावयास लावला. पेंद्यानेही राधेच्या सांगण्यानुसार डोके टेकून व हात जोडून देवाच्या मूर्तीला नमस्कार केला. राधेने देवापुढे ठेवलेल्या प्रसादातील थोडीशी लोणीसाखर पेंद्याला दिली आणि वर एक बेसनाचा लाडू त्याला दिला. पेंद्या एकदम खुशीने हसला आणि राधेचा निरोप घेऊन आपल्या कामगिरीवर आनंदाने निघून गेला.''

नारदाच्या मुखातून पेंद्याच्या बाबतीत घडलेला प्रसंग ऐकून लक्ष्मीला एकदम बरे वाटले आणि ती नारदाला म्हणाली, ''हे नारदा, हे मात्र अगदी छान झाले. राधेने पेंद्याला आधार दिला आणि जीवन जगण्याला उत्साह दिला. नाहीतर पेंद्या सारख्याची खरेच केवढी पंचाईत झाली असती. त्यांनी आधारासाठी जायचे तरी कोठे? खरे म्हणजे, कृष्णाने मथुरेला जाण्यापूर्वी सर्वांना सांगितलेच होते की 'राधेच्या रूपाने मी गोकुळात राहणारच आहे.' त्यामुळे गोकुळवासीयांची काळजीही नक्कीच दूर झाली असणार. सदासर्वकाळ त्यांच्यासाठी राधा उपलब्ध होतीच. राधेनेही सर्वांना वेळोवेळी मार्गदर्शन करून गोकुळातील लोकांना आधार व रक्षण दिलेच असणार, नाही का?''

लक्ष्मीचे बोलणे मध्येच थांबवून नारद लक्ष्मीला म्हणाला, ''अगं लक्ष्मी, कृष्णाने 'राधारूपाने मी राहणार आहे' असे म्हटले होते हे खरेच आहे. पण ते त्याने गोकुळवासीयांना सांगितलेले होते. कृष्णाने राधेला काही सर्व गोकुळाला मार्गदर्शन करण्याची जबाबदारी घेण्यास सांगितलेले नव्हते. त्यामुळे राधेने त्यासाठी काही मुद्दामहून पुढाकार घेण्याचा प्रश्नच निर्माण होत नव्हता. राधा कृष्णाचा हेतू जाणून असल्यामुळे तीही स्वतःहून कधीही कोणाला भेटतच नव्हती. राधा एक स्त्री आणि त्यातूनही विवाहित स्त्री होती. त्याच्या बाह्य मर्यादा तिलाही ठाऊक होत्याच. त्या मर्यादेतच ती आपले जीवन आनंदाने जगत होती. बरे, गोकुळातील लोकांनीही जरी कृष्णाचे वचन ऐकलेले होते तरी सर्वांनाच ते मानवले होते असेही नाही. काही जण तर कृष्णाचे बोलणे विसरूनही गेले होते. काही जणांना वाटले त्यांचे जीवन जगण्यास ते सबळ आहेत, ते लोक आपले जीवन जमेल तसे जगत राहिले. काहींना अडचणी आल्या खऱ्या, पण राधा एक स्त्री आहे हे ते विसरू शकले नाहीत. राधेला काही विचारणे किंवा सांगणे त्यांना कमीपणाचे वाटले.

अनेक गोपगोपींच्या ठिकाणी कृष्णाच्या प्रेमाच्या स्मृतीही होत्या. काही कारणपरत्वे मधून मधून त्यांना कृष्णाची आठवणही येत असे आणि त्या आठवणींनी त्यांचे मनही भरून येत असे. परंतु त्यांची ही मनाची भावनात्मक अवस्था थोडा

काळच टिकत असे.  नंतर फिरून त्यांचे मन संसारात गुंतत असे आणि काही जणांचे मन तर पुन्हा संसारात रमतही असे. कारण कृष्णाचे त्यांच्यावरचे प्रेम अनुभवूनही, कृष्णावरती प्रेम खऱ्या अर्थाने फारच थोड्यांच्या ठिकाणी निर्माण झालेले होते. त्यामुळे प्रत्येकजण त्याच्या त्याच्या भावनेनुसार कृष्णाचे प्रेम कमी जास्त प्रमाणात अनुभवत होता.  परंतु कृष्णाच्या भक्तिभावातून अंतःकरणात कृष्णस्वरूपाचा यथार्थ अनुभव घेणारी मात्र एकीएक राधाच होती.  अंतःकरणात कृष्णाच्या



अस्तित्वाचा आनंद नित्य अनुभवणारी फक्त राधाच होती आणि त्याच अनुभवाचे प्रतिबिंब व पडसाद तिच्या बाह्य जीवनात सहजपणे व प्रकर्षाने प्रगट होत असत.  मग ते कोणाच्या लक्षात आले असेल किंवा नसेल आणि आले असले तरी पूर्णपणेही लक्षात आले नसेल.  पण प्रेमभक्तिभावाने कृष्णाशी ऐक्य पावलेली राधा अंतर्बाह्य कृष्णमय होऊन राहिली होती एवढे मात्र खरे.

हे लक्ष्मी, अशा तऱ्हेने राधेचे बाह्य जीवन नित्यक्रमानुसार चालले होते आणि त्या जीवनात ती शांत, सुखी व समाधानी होती.  परंतु राधा अंतःकरणात मात्र नित्य कृष्णप्रेमातच रमलेली असे. पेंद्या तिच्या भेटीला दररोज येत असे.  त्याच्याशी बोलून राधा पेंद्याचा जीवन जगण्याचा उत्साह कायम ठेवी.  अनयाशी सुद्धा तिचे बोलणे मधून मधून होत असे.  पण अनयाच्या बोलण्यात कृष्णाच्या सहवासातील स्मृतींचा उल्लेखच जास्त करून येत असे.  रोज नंदाच्या वाड्यावर त्याचे जाणे असल्यामुळे नंद व यशोदा यांची ख्याली खुशाली अनय नेहमी राधेला सांगत असे.  त्यांचा 'राधेला वाड्यावर बोलावल्याचा' निरोपही अनय देत असे.  पण राधा आवश्यक त्या बाह्य गोष्टी करून जास्त करून अंतर्मुखच असे.

*****

# राधेची सखी मुरली

**ए**कदा अशीच राधा अंतर्मुख अवस्थेत देवघरात देवाच्या मूर्तीसमोर बसली होती. अंतःकरणात कृष्णमूर्तीची मानस पूजा नित्य करणारी राधा देवमूर्तीची षोडषोपचारे पूजा अंतःकरणपूर्वक करीत होती. पूजा करताना आज राधेचे अंतःकरण विशेषत्वाने भरून येत होते. बाह्यांगाची पूजा संपली तरीही राधा मूर्तीसमोर बसूनच होती. आज तेथून उठण्यासाठी तिचे मनच घेईना. किती तरी वेळ ती तशीच बसून राहिली होती. तोच राधेची नजर एकदम देव्हाऱ्यात ठेवलेल्या कृष्णाच्या मुरलीकडे गेली.

मूर्तीची पूजा करीत असताना राधा त्या मुरलीचीही प्रेमाने पूजा करीत असे. राधेसाठी ती मुरली केवळ कृष्णाचे स्मृतिचिन्ह नव्हती, तर कृष्णाच्या अंतःकरणातील स्वानंदाच्या नादाचे निनाद प्रगट करणारी, कृष्णाने प्रेमभराने आपल्या हृदयाशी धरलेली आणि कृष्णाच्या अधरांना प्रेमाने बिलगून राहण्याचे भाग्य लाभलेली अशी ती मुरली म्हणजे कृष्णाची प्रिय सखीच होती. आज त्या मुरलीला पाहून राधेला विशेष आनंद होत होता. तिच्या मनात एकदम एक विचार आला 'ही मुरली जशी कृष्णाची प्रिय सखी आहे तशी मीसुद्धा कृष्णाची प्रिय सखी आहेच की. कारण कृष्ण हा माझा अत्यंत प्रिय सखा होऊन राहिलेला आहे. मग माझे व या मुरलीचे सुद्धा सख्य असलेच पाहिजे. मी तर त्या मुरलीचे सख्यत्व अनुभवण्याऐवजी तिची रोज नुसती पूजाच करीत बसले आहे. अरे, मी तर या कृष्णाच्या सखीला त्याच्या दुसऱ्या सखीपासून दूरच ठेवत आहे. हे बरोबरच नाही. कृष्णाच्या दोन प्रिय सख्यांचेही सख्यत्व झालेच पाहिजे.'

असा विचार मनात आल्याबरोबर राधेला एकदम हसूच आले. ती अगदी मोकळेपणाने हसली आणि तिने ती मुरली उचलून आपल्या हातात घेतली. त्या मुरलीच्या स्पर्शानेच राधेचे सर्वांग मोहरून आले. कृष्णाच्या प्रेमळ व हळुवार स्पर्शाचे तिला केवळ स्मरणच झाले असे नाही, तर राधेने तो कृष्णाचा दिव्य स्पर्श प्रत्यक्ष अनुभवलाही. कृष्णाची प्रेमळ पण गंभीर मूर्ती आपल्या दृष्टीसमोर आणून राधेने आपल्या डोळ्यांच्या पापण्या अलगद मिटून घेतल्या. तिचे नेत्र भरून वाहू लागले. मुरलीला आपल्या हृदयाशी धरून राधेने आपले नाजुक ओठ त्या मुरलीच्या मुखावर अलगदपणे टेकले. आपली नाजुक बोटेही राधेने त्या मुरलीच्या सर्व छिद्रांवर हळुवारपणे ठेवली. पूर्णपणे अंतर्मुख झालेल्या राधेच्या अंतःकरणात एकदम आतापर्यंत अनुभवलेल्या सर्व कृष्णभेटींचा आनंद साकार होऊ लागला. त्याचीच परिणती राधेच्या ठिकाणी दाटून राहिलेले कृष्णप्रेम उचंबळून येण्यात झाली आणि तिचा कंठ दाटून आला.

तोच अचानक एखादा चमत्कार झाल्याप्रमाणे त्या मुरलीमधून मधुर सुरांचा नाद घुमू लागला आणि आनंदाच्या एका आगळ्या वेगळ्या विश्वात राधा स्वतःला हरवून बसली. अंतःकरणात स्फुरणाऱ्या कृष्णप्रेमाच्या लहरींवरती लहरी या विविध व मधुर स्वरलहरींच्या द्वारा प्रगट होऊ लागल्या. मुरलीतून प्रगटणारे ईश्वरी संगीताचे व अवीट गोडीचे सूर राधेच्या श्रवणाद्वारे थेट तिच्या अंतःकरणाला जाऊन स्पर्श करीत आणि त्यामुळे त्या ठिकाणी पुन्हा प्रेमाच्या अधिकच लहरी निर्माण

होत.  अशा उत्कट प्रेमाच्या आनंददायी अवस्थेत राधा किती वेळ होती ते तिचे तिलाही कळणे शक्यच नव्हते.  कारण राधेच्या दृष्टीने तिच्यासाठी सर्व मोजमापे थांबलीच होती.  परंतु काही काळानंतर अगदी सहजपणे राधा हळुहळू देहभानावर आली.  तरीही तिच्या अंतःकरणातील नाद मात्र अजूनही घुमतच होता जो फक्त राधेलाच ऐकू येत होता.  राधेने आपले नेत्र उघडून हातातील मुरलीकडे अत्यंत प्रेमभराने पाहिले आणि तिला आपल्या हृदयाशी जवळ धरले.  नंतर त्या मुरलीचा आपल्या नेत्रांना स्पर्श करून राधेने ती मुरली पुन्हा देव्हाऱ्यात ठेवली.

हे लक्ष्मी, श्रवण करीत असताना तुझ्या मुखावर आलेल्या भावावरूनच तुला वाटत असलेले आश्चर्य स्पष्टपणे दिसत आहे.  राधेने आधी कधीही मुरली वाजवली नव्हती किंवा कृष्णानेही राधेला कधी मुरली वाजवायला शिकवले नव्हते. राधेने कधी तरी गमतीने मुरली वाजवण्याचा प्रयत्न केला तर कृष्ण राधेची चेष्टाच करीत असे.  मग असे अचानक राधेने मुरली वाजवायला लागावे याचे तुला नवल वाटणे अगदी साहजिकच आहे.  परंतु याचे केवळ दोनच शब्दाच उत्तर द्यायचे तर 'कृष्णप्रेमाची ही किमया सारी' असेच द्यावे लागेल.  मुख्य म्हणजे राधेलाही ते माहीत होते.  तिच्याकडून घडणारे मुरलीवादन ही 'तिच्या अंतःकरणात नित्य खेळणाऱ्या व रंगणाऱ्या कृष्णप्रेमाचीच जादू होती' याची निश्चिती राधेच्या ठिकाणी होती. कारण राधेच्या ठायी कृष्णाची प्रेमभक्तिच एवढी मुरली होती.  राधेच्या अंतःकरणातील कृष्णाच्या अस्तित्वाचीच ती प्रचिती होती याची जाणीव राधेच्या ठिकाणी होती.  म्हणूनच असे मुरलीवादन तिने स्वतःच्या स्वतःपुरतेच मर्यादित ठेवलेले होते. कारण ते फक्त तिच्या तिच्यासाठीच होते.  कधीही दुसऱ्या कोणासमोर राधेने त्या गोष्टीची वाच्यता केलीच नाही.

दररोज देवमूर्तीची पूजाअर्चा झाल्यावर राधा अंतःकरणातील कृष्णाचे प्रेमस्मरण करून मुरली वाजवून त्या कृष्णाला आळवीत असे.  त्यावेळी राधेकडून तिच्या अंतःकरणाच्या अवस्थेनुसार कधी आर्ततेचे सूर, तर कधी तृप्ततेचे सूर, कधी प्रेमाच्या उत्कटतेचे सूर, तर कधी भक्तिभावाचे आनंददायी सूर सहजपणे प्रगट होत असत.  स्वतःच्याच अंतःकरणातून उत्स्फूर्तपणे प्रगट होणारा तो मधुर स्वरविलास श्रवण करताना राधेला तर अमृताच्या सागरातच बुडाल्याचा अनुभव येत असे. राधेला तिच्या अंतःकरणात दाटून असलेला भक्तिभाव प्रगट करून त्याचा आनंद अनुभवण्याचे एक माध्यमच मुरलीवादनाच्या रूपाने मिळाले.  त्याचा अनुभव मात्र ती एकांतात देवघरात दार लावून आणि देवमूर्तीसमोर बसूनच घेत असे.  त्यावेळी अनयही कामानिमित्त बाहेर गेलेला असे आणि तिच्या सासूबाई बाहेर गेलेल्या असल्यामुळे राधेला आवश्यक तो व पुरेसा एकांत मिळत असे.

एकदा राधा अशीच देवघरात बसून एकांतात मुरली वादनाच्या नादात तन्मय झालेली असताना अचानक तेथे पेंद्याचे येणे झाले.  म्हाळसाकाकू स्वयंपाकगृहात काहीतरी कामात मग्न होत्या.  त्यांच्याकडे पेंद्याने 'राधा कुठे आहे' असे प्रश्नार्थक मुद्रेने विचारले असता त्यांनीही खुणेने देवघराकडे बोट दाखवले.  देवघराचे द्वार बंद होते.  राधा देवपूजेत रमलेली असणार असे ओळखून पेंद्या बाहेरच्या खोलीत जात होता.  तेवढ्यात त्याला मुरलीचा मंद सूर कानावर आल्यासारखा वाटला.

पेंद्याचा क्षणभर त्याच्या कानावर विश्वासच बसेना. पण तरीही त्या नादाचा कानोसा घेण्याचा प्रयत्न पेंद्याकडून जसा जसा सहजपणे घडू लागला, तशी तशी पेंद्याची पावले देवघराच्या दिशेनेच पडू लागली.

देवघराच्या बंद दरवाजाला पेंद्याने बाहेरून कान लावला तो त्याची खात्रीच पटली की मुरलीचे सूर देवघराच्या आतूनच येत आहेत आणि त्याला आश्चर्याचा धक्काच बसला. कारण असे सुमधुर व मनमोही सूर फक्त कृष्णाच्याच मुरलीतून बाहेर पडतात हे त्याला निश्चितपणे माहीत होते. त्यामुळे देवघरात नक्की कृष्णच असणार याविषयी पेंद्याच्या मनात जराही शंका उरली नाही. 'मथुरेला गेलेला कृष्ण त्याचे सर्व काम पूर्ण करून गोकुळाला परत आला की काय? मग ते मला कसे कळले नाही बरे? बहुतेक कृष्ण आजच किंवा आताच आला असावा.' असा विचार मनात करीत पेंद्याने देवघराचा तो दरवाजा किंचितसा ढकलला, तर तो दरवाजा राधेने आतून कडी लावलेली नसल्यामुळे थोडासा उघडला गेला. पेंद्याने आतमध्ये मोठ्या उत्सुकतेने डोकावून पाहिले आणि आतील दृश्य पाहून पेंद्या तर एकदम चकितच झाला.

राधा देवाच्या मूर्तीसमोर एकटीच बसलेली होती. राधेचे नेत्र पूर्ण मिटलेले होते आणि तिने ती मुरली आपल्या दोन्ही हातात धरून ओठावर ठेवलेली होती. त्या मुरलीमधूनच अत्यंत सुस्वर व मधुर असा नाद घुमत होता आणि त्या नादात राधा पूर्णपणे दंगून गेलेली होती. देवघरात कृष्ण खरेच नाही आणि राधा एकटीच आहे याची खात्री पटल्यावर पेंद्या हळूच आतमध्ये शिरला. काहीही आवाज न करता व न बोलता पेंद्या राधेच्या बाजूला खाली बसला. एका बाजूने राधेच्या मुखावरील ते अलौकिक भाव पाहताना पेंद्याला तर कृष्णाचीच आठवण झाली. मुरली वाजवताना कृष्णाचे मुखही अशाच आगळ्या वेगळ्या भावाने युक्त झालेले असे, याचे स्मरण पेंद्याला झाले. कृष्णाचे मुरलीवादन ऐकताना जो आनंद पेंद्याला होत असे, अगदी तसाच आनंद त्याला आता राधेचे मुरलीवादन ऐकताना होत होता. राधेच्या रूपाने कृष्णालाच जणू आपण पहात आहोत असा भाव पेंद्याचा झाला आणि त्याने मनोभावे हात जोडून राधेला नमस्कार केला.

थोड्या वेळाने राधेचे मुरलीवादन आपसूकच थांबले आणि देहभानावर येऊन तिने आपले अश्रुपूर्ण नेत्र हळुहळू उघडले. बाजूलाच बसलेल्या पेंद्याकडे पाहून चकित झालेल्या राधेने स्मित हास्य केले आणि त्याच्या डोक्यावर व खांद्यावर प्रेमाने थोपटले. नंतर राधेने देवमूर्तीसमोर आपले डोके टेकून नमस्कार केला आणि पेंद्यालाही तसाच नमस्कार करावयास लावला. मूर्तीसमोरील नैवेद्यासाठी ठेवलेली लोणीसाखर प्रसाद म्हणून पेंद्याला दिली. आपल्या हातातील मुरली राधेने परत देव्हाऱ्यात ठेवली आणि प्रश्नार्थक चेहऱ्याने पाहणाऱ्या पेंद्याला उद्देशून ती म्हणाली,

''अरे पेंद्या, असा माझ्याकडे चकित होऊन नुसता पहात राहू नकोस. तुला नवल वाटणे अगदी साहजिकच आहे. परंतु ही सर्व कृष्णाची माझ्यावरील कृपा आहे. त्याच्याच प्रेमाची ही सारी किमया आहे. तुला एखादे वेळेस अशी शंका येत असेल, की कृष्णाने मथुरेला जाण्यापूर्वीच मला मुरली वाजवायला शिकवले की काय? पण तसे काही घडलेले नाही. कृष्णाने जाण्यापूर्वी अगदी उत्स्फूर्तपणे ही मुरली मला दिली. मलाही त्याचे कारण त्यावेळेस कळले नव्हते. कृष्णाने मला प्रेमाने ही मुरली दिली आणि मीही त्याच प्रेमाने ती मुरली घेतली. बस्स्, एवढेच! परंतु अशीच एकदा या देवमूर्तीची

बाह्यांगाने पूजा आणि अंतःकरणातील कृष्णमूर्तीची प्रेमपूर्वक मानसपूजा करीत असताना उत्स्फूर्तपणे ही मुरली हातात घेऊन ओठाला लावली मात्र, अंतःकरणातील कृष्णप्रेम दाटून कंठात आले आणि या मुरलीतून असे सुमधुर सूर अगदी सहजपणे बाहेर येऊ लागले. सुरुवातीला मी सुद्धा अगदी तुझ्यासारखीच चकित झाले होते. पण नंतर माझ्या लक्षात आले, हे सूर माझ्या मुखातून किंवा कंठातून मुरलीमध्ये येत नसून ते माझ्या अंतःकरणातून अगदी खोलवरून स्फुरून बाहेर येत आहेत.

मग माझ्या लक्षात आले, की माझ्या अंतःकरणात बसून माझा कृष्ण सखाच हे मुरलीवादन करीत आहे आणि त्याचेच स्वर या मुरलीद्वारे बाहेर प्रगट होत आहेत इतकेच! या दैवी सुरांचे एक विश्वच निर्माण होते. त्यामध्ये माझे अंतःकरण तर कृष्णप्रेमाने उचंबळून येतेच, परंतु माझी सर्व कायाही मोहरून येते आणि एका सर्वश्रेष्ठ आनंदाच्या अनुभवात मी स्वतःला पूर्णपणे हरवून बसते. परंतु हा माझा अनुभव अगदी व्यक्तिगत आहे आणि त्याचा अनुभवही मी नेहमी या देवघरात एकांतातच घेत असते. याविषयी मी कोणालाही सांगितलेले नाही आणि तू सुद्धा तशी वाच्यता कधी करू नकोस.''

राधेच्या बोलण्यावर पेंद्याने मान डोलवली. पण राधेला त्याने एक विनंती केली, की राधेने त्याला रोज सकाळी पूजेच्या वेळी तेथे हजर राहण्याची परवानगी द्यावी. परंतु राधेने किंचित हसूनही पेंद्याला तशी परवानगी मात्र दिली नाही. ती पेंद्याला एवढेच म्हणाली, ''ही माझी अगदी व्यक्तिगत बाब आहे आणि ती तशीच रहावी अशीच माझी इच्छा आहे. पण पेंद्या, तुलाही मी एक गोष्ट सांगते की तू सुद्धा रोज सकाळी तुझ्या घरातील देवमूर्तीसमोर थोडा वेळ तरी बसत जा आणि मनामध्ये कृष्णाचे स्मरण करीत जा. त्यामुळे तुझ्या मनाला निश्चितपणे स्थिरता लाभेल आणि शांती व समाधानाचा अनुभव तुला येईल.'' राधेचे बोलणे ऐकून पेंद्या तसाच थोडा वेळ तेथेच विचार करीत बसला आणि नंतर राधेचा निरोप घेऊन आपल्या घरी परत गेला.''

मुरली वादनाप्रमाणेच श्रवणाला मोहक वाटणारे नारदाचे बोलणे ऐकून लक्ष्मी अगदी मंत्रमुग्धच झाली होती. कृष्णाच्या माहात्म्याने व राधेच्या कौतुकाने लक्ष्मीचे अंतःकरण भरून आले होते. त्या भरातच ती नारदाला म्हणाली,

''हे नारदा, ही तर राधेच्या कृष्णभक्तिची खरेच कमालच झाली. राधेकडून घडणारे मुरलीवादन आणि त्यामागील तू उलगडून दाखवलेले रहस्य ही दोन्हीही अत्यंत रमणीयच आहेत. सगुण प्रेमभक्तिचेच हे माहात्म्य आहे यात जराही शंका नाही. पण नारदा, आता एक गोष्ट माझ्याही नक्की लक्षात आली आहे, की प्रेमभक्तिभावाने घडणारे नारायणाच्या सगुण चरित्राचे गायन हे सुद्धा मुरलीवादनच आहे. किंबहुना हेच असे मुरलीवादन आहे की जे नारायणाच्या कोणाही प्रेमीभक्ताला निश्चितपणे करता येण्यासारखे आहे. मग तुझ्यासारखा या नारायणाच्या गुणसंकीर्तनात नित्य रमलेला आणि नारायणाचा अत्यंत प्रिय भक्त, जेव्हा नारायणाच्या प्रेमाने व माहात्म्याने युक्त होऊन सगुण चरित्राचे गायन करतो, तेव्हा ते एक अप्रतिम व अनुपम असे मुरलीवादनच असते.

हे नारदा, अंतर्बाह्य कृष्णमय झालेली राधा तिच्या तिच्या ठिकाणी कृष्णप्रेमाचा नाद नित्य अनुभवीत होती आणि एकांतात मुरलीवादनाच्या द्वारेही बाह्यांगाने त्या नादाचा आनंद उपभोगीत होती. ही तिची अवस्था तर खरेच सर्वश्रेष्ठ होती. पण मग तिची ही अवस्था बाह्यांगाने इतरांच्या निमित्ताने सुद्धा किंवा इतर काही कारणाने म्हणा, कधी तरी प्रगट झाली की नाही? त्या निमित्ताने तिची अवस्था इतरांच्याही लक्षात आली असती. मग त्याचा कोणी किती उपयोग करून घ्यावा हे ज्याच्या त्याच्यावर राहिले असते. पण तिची अवस्था बाह्यांगाने सर्वांसाठीसुद्धा प्रगट होणे आवश्यकच नव्हते का?''

लक्ष्मीच्या बोलण्यावर नारदाने क्षणभर विचार केला आणि म्हणाला, ''हे लक्ष्मी, आवश्यकता ही दोन अंगाने असते. एक बाह्यांगाची आणि दुसरी आंतरिक. एखादी गोष्ट बाह्यांगाने केल्यावरती त्याचा परिणाम आंतरिक अवस्थेवर होतो, तर अंतरातील अवस्था प्रगट करण्यासाठी एखादी बाह्य गोष्ट करणे आवश्यक ठरते. राधेच्या बाबतीत तिच्या अंतःकरणाच्या परिपूर्ण अवस्थेमुळे आता बाह्य गोष्टी करून काही आंतरिक साधायचे आहे अशी तिला आवश्यकता राहिलेलीच नव्हती. त्याचप्रमाणे तिची आंतरिक अवस्था प्रगट करण्यासाठी मुद्दामहून काही करावे असा राधेचा स्वभाव नव्हता. तिची अंतरातील कृष्णप्रेमाची परिपूर्ण व सहज अवस्था इतरांसाठी प्रगट करावी आणि त्याची इतरांना माहिती व्हावी किंवा उपयोग व्हावा यासाठी मुद्दामहून काही करण्याची आवश्यकता राधेला अजिबात वाटत नव्हती. तेव्हा बाह्यांगाने काही करण्याचा तिचा स्वभावही नव्हता आणि तिला त्याची आवश्यकताही नव्हती, अशीच अवस्था राधेची होऊन राहिलेली होती. त्यामुळे अंतरात नित्य आनंदाचा अनुभव सहजपणे घेणारी राधा तिचे बाह्य जीवन मात्र अगदी शांतपणे, समाधानाने व निवांतपणे जगत होती. काहीही धावपळ नाही किंवा काही गडबड गोंधळ नाही. कोणाच्या अध्यात नाही की कोणाच्या मध्यात नाही. पण तिच्या मध्ये जो कृष्णप्रेमाचा संचार झालेला होता, त्याचा आनंद मात्र ती स्वतःच्या ठायी नित्य भोगीत असे.

हे लक्ष्मी, राधेची अशी आंतरिक पूर्णावस्था असतानाही या नारायणाची प्रेममाया प्रगट झालीच. आंतरिक आनंदाची अवस्था प्रगट न करण्याच्या राधेच्या स्वभावावर तिच्या भावाचीच मात झाली. कृष्णाविषयीचा प्रेमभक्तिभाव राधेच्या ठिकाणी एवढा उत्कट झाला की तो तिच्या अंतरात मावेनासा झाला आणि बाह्यांगाने प्रगट होण्यासाठी काहीतरी माध्यम शोधू लागला. अंतरात नित्य भरून वाहणाऱ्या कृष्णप्रेमाला बाहेर वाहण्यासाठी स्वतःच काहीतरी मार्ग काढण्याची आवश्यकता प्रकर्षाने जाणवू लागली आणि राधा अधिकच अंतर्मुख झाली. त्याचा परिणाम तिच्या वागण्या-बोलण्यात दिसू लागला आणि तो बदल तिच्या सहवासात नेहमी असणाऱ्या पेंद्यालाच आधी जाणवला. राधा त्याच्याशी पूर्वी सारखी मोकळेपणाने बोलत नाही हे पेंद्याच्या लक्षात आले. त्याने त्या बद्दल राधेला विचारलेही. परंतु राधा काहीच बोलली नाही. खरे तर, त्या प्रश्नाचे उत्तर राधाही देऊ शकली नाही. 'असे काय होते आहे' हे राधेचे राधेलाच कळत नव्हते. मग जास्त काही न विचारता पेंद्याही स्वस्थच राहिला. पेंद्या नित्यनेम राधेला भेटून व थोडा वेळ तिच्याशी बोलून जात असे. जे काही बोलणे होई तेवढ्यावरच तो मनाचे समाधान करून घेत असे. असाच काही काळ गेला आणि एक दिवस अचानक राधा पेंद्याला म्हणाली,

''अरे पेंद्या, आपल्या कृष्णाच्या जयंतीचा शुभदिन जवळ येत आहे. माझ्या मनात असे तीव्रतेने येत आहे, की आपण सर्वांनी मिळून कृष्णाची जयंती साजरी करावी. आपण सर्वजण एकत्र जमूया आणि कृष्णजयंतीचा उत्सव साजरा करूया. त्या दिवशी कृष्णाला आवडणाऱ्या सर्व गोष्टी आपण करून कृष्णाचे प्रेमाने स्मरण करूया. निरनिराळे खेळ खेळू, कृष्णाला आवडणारे पदार्थ करू आणि सर्व गोकुळवासी मिळून कृष्णाविषयीचे प्रेम व कृतज्ञता व्यक्त करू. कृष्णाचे या गोकुळावर अगणित उपकार आहेत. कृष्णाने आपणा सर्वांवर निरतिशय प्रेम केलेले आहे. कृष्णाचे ऋण आपल्याला कधीच फेडता येणार नाही. पण कृष्णाने आपल्याला आनंद कसा अनुभवायचा हे जे दाखवलेले व शिकवलेले आहे, त्या आनंदाचा अनुभव आपण सर्वजण मिळून घेऊ. त्यानिमित्ताने आपल्याला आपल्या ठिकाणच्या कृष्णप्रेमाचा अनुभव घेता येईल आणि त्याचा आनंद सर्वांनाच होईल. हो की नाही? काय पेंद्या, माझ्या मनातील हे विचार तुला कसे काय वाटतात? तुझा काय विचार आहे? अगदी मोकळेपणाने सांग बघू.''

राधेचे बोलणे ऐकून पेंद्या तर अवाकच झाला. आश्चर्याने डोळे विस्फारून व राधेकडे एकटक पहात तिचे बोलणे ऐकणाऱ्या पेंद्याचा त्याच्या कानावरती विश्वासच बसत नव्हता. 'राधा काय बोलत आहे आणि आपण काय ऐकत आहोत' यावर त्याचा कितीतरी वेळ विश्वासच बसेना. पण नंतर जेव्हा तो भानावर आला तेव्हा मात्र पेंद्याच्या डोळ्यात एक वेगळीच चमक आली आणि त्याचा चेहरा हर्षाने फुलला. पेंद्या आता फक्त मोठ्याने ओरडायचाच काय तो बाकी राहिला होता. पण तरीही मोठ्या आवाजात पेंद्याकडून शब्द सहजपणे बाहेर आलेच,

''वाह! राधे, वाह! छान, एकदमच छान! काय मस्त कल्पना तुझ्या मनात तुला सुचली आहे. आपण मानतो बुवा तुला! आता माझ्या लक्षात आले की एवढे दिवस तू नेहमी 'गप्प, गप्प' का असायचीस ते. तुझ्या मनामध्ये हेच विचार सतत घोळत असणार आणि आज बोललीस ते मात्र अगदी आश्चर्याचा सुखद धक्का देणारे असे बोललीस.

अगं राधे, पण प्रश्न असा आहे, की हे सर्व जमायचे कसे? हे सर्व कोणी करायचे आणि कसे व कोठे करायचे? मुख्य म्हणजे यासाठी पुढाकार कोणी घ्यायचा आणि या सर्वाची जबाबदारी कोणी घ्यायची? बरे, सर्वांनाच हा विचार आवडेल का आणि पटेल का? सर्वांचे सहकार्य मिळेल का? माझ्या मनात तर या विचारांचा व प्रश्नांचा नुसता गोंधळ उडून गेलेला आहे. तूच तो गोंधळ दूर कर बघू.''

पेंद्याची एकीकडे आनंदीत पण तरीही दुसरीकडे गोंधळलेली अशी मनाची स्थिती पाहून राधेला गंमतच वाटली. पण तरीही ती मात्र गंभीरपणेच पेंद्याला म्हणाली, ''अरे पेंद्या, असा उगाचच गोंधळू नकोस आणि पुढे घडणाऱ्या गोष्टींची विनाकारण कल्पना करून आतापासूनच त्यांची मनाला काळजी लावून घेऊ नकोस. आता आपल्या प्रिय कृष्णाची जयंती साजरी करायची आपणच ठरवले आहे ना? मग सर्व जबाबदारी व पुढाकार आपणच घ्यायचा हे ओघाने आलेच. आपल्याला जसे व जेवढे जमेल तसे व तेवढे आपण करू. सर्वांना तसे कळवू आणि त्यांना सहभागी होण्यासाठी विनंतीपूर्वक आमंत्रणही करू. मग पुढे काय व कसे घडेल ही तर त्या ईश्वराचीच मर्जी. जो तो ज्याच्या त्याच्या भावानुसार

व स्वभावानुसार काय ते ठरवेल. जे आपल्या बरोबर प्रेमाने येतील त्यांना आपल्या संगे घेऊन आणि जे येणार नाहीत त्यांचा जराही राग न धरता आपण कृष्णजयंती साजरी करायची.

मुख्य काय, तर आपल्याला कृष्णप्रेम प्रगट करून आनंद अनुभवायचा आहे हेच खरे. त्यासाठी ज्यांची साथ व सहकार्य लाभेल ते आपण जरूर घेऊ. नाहीतर आपले आपण आहोतच की. हो की नाही? आजच मी प्रथम अनयांशी बोलते. त्यांची साथ आपल्याला नक्की मिळणार याची मला अगदी खात्री आहे. नंद व यशोदा यांचीही संमती व सहकार्य आपल्याला निश्चितच लाभेल. तेव्हा पेंद्या, तू काहीही काळजी मनात न धरता आता घरी जा. सर्व काही व्यवस्थित व ठीक होईल. पण या गोष्टीविषयी सध्या तरी तू काही वाच्यता करू नकोस. योग्य वेळी हे सर्वांना आपण कळीत करू.''

राधेच्या बोलण्याने पेंद्याचे समाधान झाले. त्याच्या मनातील काळजी तेवढा वेळ तरी दूर झाली. पेंद्याने हसून राधेचा निरोप घेतला आणि तो आपल्या घरी गेला. राधेनेही मग त्याच दिवशी संध्याकाळी अनयाकडे आपल्या मनातील विचार प्रगट केला. तो ऐकून अनयाचा आनंद त्याच्या मनात मावेनासाच झाला. राधेचे हात हातात घेऊन अनयाने तिच्याशी प्रेमाने हस्तांदोलन करून आपला आनंद व्यक्त करण्याचा प्रयत्न केला खरा, परंतु तेवढ्याने अनयाचे काहीच समाधान झाले नाही. म्हणून अनयाने मग राधेला प्रेमाने आपल्याजवळ घेऊन तिची पाठ थोपटली तेव्हा कोठे अनयाचे जरासे समाधान झाले. नंतर अनय व राधा लगेचच नंदाच्या राजवाड्यावर गेले आणि त्यांनी आपला विचार नंद व यशोदा यांच्या कानावर घातला. त्या दोघांनाही अत्यंत हर्षच झाला. कृष्णाच्या स्मरणाने नंद व यशोदा यांना भरूनच आले. राधा व अनय या दोघांचे मात्र त्यांनी अत्यंत कौतुक केले. त्याचबरोबर कृष्णजयंतीच्या कार्यक्रमात सहभागी होण्याचे व सर्व सहकार्य करण्याचे आश्वासनही दिले. हा कार्यक्रम कसा व कुठे करायचा हे सर्व राधा व अनय यांनीच ठरवावे असेही नंदाने निक्षून सांगितले.

राधा, अनय व पेंद्या यांनी कृष्णजयंती उत्सव कोठे साजरा करावा या विषयी बराच विचार विनिमय केला. 'यमुनाकाठी करावा, की गोवर्धन पर्वतावर करावा, की नंदाच्या राजवाड्यातच करावा' या विषयी बरीच चर्चा केली. प्रत्येक जागेशी सर्वांचीच काहीतरी भावना जोडली गेलेली होती. यमुनाकाठी कालियाचे मर्दन व त्याला निर्विष करून कृष्णाने अनयाचे प्राणच वाचवलेले होते. गोवर्धन पर्वतावर मुसळधार पर्जन्यवृष्टीपासून कृष्णाने सर्व गोकुळाचेच संरक्षण केलेले होते आणि नंदाचा राजवाडा हे तर कृष्णाचे बालपणापासूनचेच असलेले वसतीस्थान होते.

परंतु राधा म्हणाली की ''वृंदावन हे तर कृष्णाचे अत्यंत प्रिय असे स्वस्थानच होते. जेव्हा जेव्हा संधी मिळे तेव्हा तेव्हा कृष्ण या वृंदावनातील कुंजवनातच कितीतरी वेळ एकांतात निवांतपणे व्यतीत करीत असे आणि अंतर्मुख होऊन बसत असे. खऱ्या अर्थाने कृष्णाचे मन या वृंदावनातच रमत असे.'' राधेच्या या बोलण्याला पेंद्याने दुजोरा दिला आणि अनयानेही संमती दिली. प्रत्यक्ष कृष्णजयंतीच्या दिवशी काय कार्यक्रम करावा हे आधीपासूनच न ठरवता 'त्या दिवशी व त्या वेळेस उत्स्फूर्तपणे जसे जसे सुचेल तसे तसे सर्वांच्या संमतीने करावे' असेच ठरले. सर्वांना फक्त आपल्याबरोबर येताना जमेल तसे

काहीतरी पदार्थ करून आणावयास सांगावेत एवढे नक्की झाले. गोकुळातील सर्वांच्या घरी जाऊन सर्वांना या कार्यक्रमाविषयी कळीत करायचे आणि प्रेमाने आमंत्रण द्यायचे ही कामगिरी मात्र अनय व पेंद्या यांनी स्वतःवर घेतली.

हे लक्ष्मी, लगेच दुसऱ्या दिवसापासूनच अनय व पेंद्या यांनी घरोघरी जाऊन आणि सर्वांना प्रत्यक्ष भेटून व्यक्तिगत आमंत्रण करावयास सुरुवात केली सुद्धा. त्या दोघांच्या ठिकाणचा उत्साह अगदी जोरदार होता. परंतु लोकांकडून त्यांना मिळणाऱ्या प्रतिक्रिया मात्र अगदी भिन्न भिन्न होत्या. कोणी या योजनेचे स्वागत केले आणि म्हणाले, 'अरे वा, तुम्ही अगदी चांगली गोष्ट करावयाची ठरवले आहे. आम्ही नक्की येऊ.' कोणाच्या ठिकाणचा कृष्णाविषयीचा कृतज्ञभाव जागा झाला आणि ते म्हणाले, 'अरे, कृष्णाने आपल्या सर्वांसाठी एवढे काही केलेले आहे, तेव्हा आपण त्याच्या वर्धापन दिनी काहीतरी केलेच पाहिजे.' कोणी थोडेसे काळजीने म्हणाले, 'सर्वांनी एकत्र येऊन असा कार्यक्रम करायचा म्हणजे उगाच सगळ्यांना व्याप किंवा तापच होईल. त्यापेक्षा ज्याला जसे जमेल तसे त्याने तो दिवस साजरा करावा हेच बरे.' कोणाला रागही आला आणि ते म्हणाले, 'ही नसती उठाठेव तुम्हाला सांगितली कोणी? आणि तुम्हा लहान मुलांचे हे कामच नव्हे. गोकुळात जी मोठी माणसे आहेत ती काय ते ठरवतील.' कोणाच्या मनात काही वेगळाच संशय आला. 'केवळ नंद व यशोदा यांना खूश करण्यासाठी तर तुम्ही हे सर्व करीत नाही ना? हे सर्व करण्यात तुमचा काय फायदा असेल तो असेल, ते फक्त तुम्हालाच ठाऊक. पण आम्हाला त्याचा काहीच उपयोग नाही. तेव्हा आमचा सहभाग अपेक्षित धरू नका' असे त्यांनी स्पष्टच सांगितले.

हे लक्ष्मी, हे सर्व ऐकून तुझ्या मुखावरील नवलाईचे आणि तुला वाईट वाटल्याचे दोन्ही भाव मला स्पष्टपणे दिसत आहेत. अर्थात यात वाईट वाटण्यासारखे निश्चितच आहे. पण नवल वाटण्यासारखे मात्र काही नाही. सामान्य लोक दुसऱ्यांनी आपल्यासाठी केलेल्या चांगल्या गोष्टी त्वरित विसरतात. विस्मरण हा सामान्य जिवाच्या ठिकाणचा महत्त्वाचा दोष आहे. चांगल्या गोष्टी विसरणे आणि इतर गोष्टीच आठवत बसणे हा सामान्यांचा सहज स्वभावच असतो. त्यांना चांगल्या घडलेल्या गोष्टींची मुद्दामहून आठवणच करून द्यावी लागते. तरीही त्यांच्या लक्षात येईलच आणि त्यांना त्याची आठवण राहीलच याची पुन्हा काहीही खात्री देता येत नाही ती नाहीच.

अर्थात, असे निदान कृष्णाच्या बाबतीत तरी घडायला नको होते असे तुला नक्कीच वाटत असणार आणि तसे वाटणे अगदी साहजिक व बरोबरच आहे. परंतु कृष्णाचे असामान्यत्व जरी सामान्यांपर्यंत पोहोचले, तरी त्यांना ते कळणे वा पूर्णपणे आकलन होणे हे वाटते तेवढे सोपे नव्हतेच. सामान्यांवरती कृष्णाच्या प्रेमाचा पडलेला प्रभाव हा सुद्धा तात्पुरताच होता. त्यातील काही जणांच्या ठिकाणीच कृष्णाविषयी प्रेम निर्माण झाले. त्या प्रेमामुळेच काही जण कृष्णाच्या जवळ आले. त्यातीलही फक्त राधेनेच कृष्णाचे अंतःकरण ओळखले आणि तिच्या ठिकाणी कृष्णाविषयी भक्तिभाव निर्माण झाला. या भक्तिभावानेच राधेने कृष्णाचे व्यापक माहात्म्य जाणले आणि ते माहात्म्य हा तिचाही कायमचा अनुभव होऊन राहिला.

म्हणूनच तर अशी कृष्णजयंती साजरी करावी हा विचारही फक्त तिच्याच ठिकाणी स्फुरला होता आणि त्याचा खरा आनंदही राधाच अनुभवणार होती.

हे लक्ष्मी, तुझ्या मनाला एवढे वाईट वाटले ना? मग अनय व पेंद्या यांनाही केवढे वाईट वाटले असेल बरे? सर्व गोकुळवासीयांकडून या कार्यक्रमाला एकमुखी प्रतिसाद हमखास मिळेल, अशी पक्की खात्री बाळगून असलेल्या अनय व पेंद्या यांचा तर चांगलाच अपेक्षाभंग झाला. लोकांच्या भिन्न भिन्न आणि त्यातूनही काही नकारात्मक प्रतिक्रिया ऐकून व बघून त्या दोघांना अत्यंत वाईट तर वाटलेच, पण ते अतिशय नाराजही झाले. कार्यक्रम करण्यासंबंधीचा त्यांचा उत्साह कमी होऊ लागला. एवढेच नव्हे तर, कार्यक्रम करावा की न करावा या संबंधी त्यांच्या मनाची द्विधा स्थितीच झाली. परंतु राधा त्या दोघांची समजूत काढीत त्यांना म्हणाली.

''तुम्ही अजिबात वाईट वाटून घेऊ नका आणि नाराज होण्याचे तर काहीच कारण नाही. मुळामध्ये आपण कृष्णाविषयीचे प्रेम व कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी या कार्यक्रमाचे आयोजन करीत आहोत हे लक्षात ठेवा. तसे पाहिले तर आपणही आपल्या घरातल्या घरातच कृष्णाचा जयंतीदिन साजरा करू शकलो असतो. परंतु हे कृष्णाच्या प्रेमाला साजेसे झालेच नसते. कृष्णाठिकाणी सर्वांविषयीचा आपलेपणा व प्रेम नेहमी कायम असे आणि म्हणून तो कोणतीही गोष्ट अगदी त्याची घरगुती व व्यक्तिगत असली तरी सुद्धा सर्वांना प्रेमाने व आग्रहाने बोलावून त्याचा एक कार्यक्रमच करीत असे. लोकांनी त्याला प्रतिसाद दिला वा न दिला, तरी त्याच्या ठिकाणचा उत्साह मात्र नेहमीच कायम असे आणि त्या कार्यक्रमाचा आनंद कृष्ण तरी अगदी पुरेपूर घेत असे.

तेव्हा अशा आपल्या कृष्णाची जयंती आपण सुद्धा तशीच साजरी करायला नको का? आपण आपल्याला त्याचे म्हणवून घेतो ना? मग त्याच्या स्वभावानुसारच आपले वागणे घडायला नको का? आपण कुठेतरी कोपऱ्यात बसून आपल्या ठिकाणच्या कृष्णप्रेमाचा अनुभव घेत रहावे हे कृष्णाला कधी तरी मान्य होईल का? नाही ना! मग आपल्याला कोणाच्याही टीकेकडे लक्ष देण्याचे काहीच कारण नाही. आपल्या ठिकाणी असलेल्या कृष्णाला आपल्याला तोष द्यायचा आहे. त्या कृष्णालाच प्रसन्न करून आनंदीत करायचे आहे. म्हणजेच आपल्यालाही त्याच्यासारख्या खऱ्या आनंदाचा अनुभव अगदी सहजपणे व खात्रीने होईल. आपला भाव कृष्णाला पावल्याची तीच तर खूण आहे. तेव्हा आता स्वस्थ न बसता अगदी उत्साहाने कार्यक्रमाच्या तयारीला लागूया.''

*****

# कृष्णजयंती सोहळा

**हे** लक्ष्मी, राधेच्या बोलण्याने अनय व पेंद्या यांच्या ठिकाणचा उत्साह पुन्हा केवळ जागा झाला एवढेच नव्हे, तर तो दुणावलाच. अनय व पेंद्या यांनी स्वतः पाहणी करून वृंदावनात कोठे कार्यक्रम करायचा त्याची जागा निश्चित केली. पेंद्याने व त्याच्या सवंगड्यांनी ती जागा तेथील सर्व पालापाचोळा झाडून साफ केली. राधेसह अनेक गोपींनी एकत्र जमून निरनिराळ्या रंगीत फुलांच्या माळा गुंफून तयार केल्या. अनेक प्रकारच्या रचना करून विविध आकाराची तोरणेही तयार करून ठेवली. हे सर्व करीत असताना त्या गोपगोपींना एका वेगळ्याच प्रकारच्या आनंदाचा अनुभव येत होता. कृष्णाच्या प्रेमाने भरलेली त्यांची मने कृष्णस्मरणाने पुन्हा त्याच्या प्रेमात रंगू लागली होती. कृष्णाच्या प्रेमळ आठवणी काढून पुन्हा पुन्हा ते एकमेकांना सांगत होते. कृष्णाच्या एकेक गुणाचे वर्णन करताना त्यांच्याठायीचे कृष्णप्रेम द्विगुणित होत होते.

अशा तऱ्हेने एका वेगळ्याच प्रकारच्या कृष्णप्रेमाच्या धुंदीत ते गोपगोपी वावरत होते. त्यांच्या अत्यंत प्रेमाच्या असलेल्या अशा कृष्णाचा जयंतीदिन त्यांना साजरा करावयाचा होता आणि त्या निमित्ताने त्यांच्या ठिकाणच्या कृष्णप्रेमाचा अनुभव त्यांना घ्यायचा होता. तोच एकीएक ध्यास त्यांच्या मनाला लागून राहिलेला होता. त्या ध्यासापोटी त्यांचे दुसऱ्या कशाकडेच धड लक्ष लागत नव्हते. नित्याचे खाणेपिणेही त्यांना गोड लागत नव्हते. केव्हा एकदा कृष्णजयंतीचा दिवस येतो असेच त्या सर्वांना झाले होते. पण राधा मात्र अगदी शांत व निवांत होती. मोकळेपणाने तिचे सर्व जीवन राधा जगत होती आणि सर्वांशी मोकळेपणाने बोलून व वागून राधा सर्वांचा उत्साह वाढवीत होती. परंतु स्वतःठायी राधा गंभीरच होती. तिच्या अंतःकरणातील अत्यंत सखोल असलेल्या कृष्णमूर्तीच्या प्रेमस्वरूपात राधा पूर्णपणे बुडून राहिली असल्याचेच ती गंभीरता म्हणजे लक्षण होते.

अखेर सर्वांच्या ठिकाणची आतुरता व उत्सुकता ज्याच्यामुळे व ज्याच्यासाठी एवढी शिगेला पोहोचली होती तो कृष्णजयंतीचा म्हणजे श्रावण वद्य अष्टमीचा शुभदिवस उजाडला. पर्जन्यकाळ असूनही आज सूर्यनारायण प्रसन्न मुद्रेने प्रकाशित होत होता. कृष्णजयंतीचा सोहळा आज त्यालाही जणू अनुभवायचा होता. सर्व सृष्टीचा अधिष्ठाता असलेला असा तो तेजोनिधी भास्कर आज कृष्णजयंतीच्या निमित्ताने सोनेरी किरणांची जणू उधळणच करीत होता. त्या सोनेरी प्रकाशात सर्व सृष्टीच उजळून निघाली होती आणि त्या सृष्टीचे सौंदर्य आज विशेषत्वाने खुलून प्रगट होत होते. वर्षा ऋतुची सुरुवातच भरपूर पावसाने झालेली असल्यामुळे सृष्टीचे 'सुजलाम् सुफलाम्' रूप अतिशय रमणीय दिसत होते. हिरवे गवत, हिरवी पाने अशा हिरव्या रंगातच सर्व सृष्टी रंगलेली भासत होती. झाडांवरून अजूनही पावसाचे साचलेले पाणी ओघळत होते. पानावरील जलबिंदूवर पडलेल्या सूर्याच्या प्रकाश किरणांमुळे ते जलबिंदू तर मोत्यासारखे चमचमत होते. अशा अत्यंत प्रसन्न वातावरणाने, सकाळी लवकरच जाग आलेल्या गोकुळवासीयांचे स्वागत केले. सर्वत्र एकीएक मांगल्याचा व शुभदायी असा भाव भरून राहिलेला होता.

राधेला तर भल्या पहाटेच जाग आली असे म्हणावे, तर खरे तर ती रात्रभर जागीच होती. त्यामुळे पहाटेचे झुंजूमुंजू झाल्याची जाणीव झाल्याबरोबरच राधा लगबगीने उठली. उठल्या बरोबर तिने आधी देवघरात जाऊन देव्हाऱ्यातील मूर्तीसमोर हात जोडून नमस्कार केला आणि मूर्तीसमोरील समईतील मंद झालेली वात जरा मोठी केली. त्या मंद प्रकाशात जशी देवाची मूर्ती उजळून निघाली, तसेच राधेचे मुखही उजळून निघाले. मूर्तीच्या मुखावरील प्रसन्नता राधेच्या मुखावरही प्रतिबिंबित झाली. राधेने तिचे प्रातर्विधी पटापट उरकले आणि स्नान करून झाल्यावर अनयाला जागे केले. तोही जागा झालेलाच होता. राधेचे प्रसन्न मुख पाहून अनयही तिच्याकडे बघून हसला. राधेने खुणेनेच त्याला लवकर तयार होण्यास सांगितल्यावर अनयानेही त्याचे सर्व आन्हिक त्वरित आवरले.

आज म्हाळसाकाकूही उत्साहात होत्या. स्वयंपाकघरात राधेला काही पदार्थ बनवण्यासाठी मदतही करीत होत्या आणि काही पदार्थ स्वतःच्या हाताने तयार करीत होत्या. थोड्याच वेळात पेंद्याही तेथे येऊन पोहोचला. आज त्याने तर अगदी खास पोषाख केला होता. अनयानेही आज ठेवणीतले कपडे घातले होते. म्हाळसाही आज जरीची साडी नेसून तयार झाली होती. राधेने मात्र अगदी साधी पांढरी शुभ्र साडी नेसली होती. अनय व पेंद्या यांनी बरोबर न्यायचे सामान घेतले आणि राधेच्या सूचनेनुसार ते वृंदावनाकडे पुढे निघाले. राधेने निघताना पुन्हा एकदा देवाच्या मूर्तीचे वाकून दर्शन घेतले. तिचे अंतःकरण प्रेमाने दाटून भरून आले. राधेचा कंठही गहिवरून आला आणि ती सद्‌गदित झाली. पण तिने स्वतःला सावरले आणि म्हाळसाकाकूंना हात धरून हळुहळू चालवीत राधा वृंदावनाच्या दिशेने चालू लागली.

राधेचे वृंदावनामध्ये जेव्हा आगमन झाले तेव्हा अनय, पेंद्या व त्याच्या सवंगड्यांनी तेथे अनेक गुढ्या व तोरणे उभारून आणि झाडा-झाडांवरून विविध फुलांच्या माळा बांधून त्या मूळच्याच अती सुंदर व सुरम्य परिसराला अधिकच सुशोभित केले होते. राधा आल्याबरोबर तिचे सर्वांनीच प्रेमाने स्वागत केले. राधेनेही त्यांनी तेथे केलेल्या सर्व सजावटीचे मनःपूर्वक कौतुक करून त्यांची पाठ थोपटली. परंतु पेंद्या मात्र थोडासा नाराज दिसत होता कारण फारशी मंडळी अजून जमा झालेली नव्हती. राधेच्या लक्षात पेंद्याची नाराजी आल्यावरती तिने पेंद्याची समजूत घातली आणि थोडासा धीर धरण्यास सांगितले.

थोड्याच वेळात तेथे नंद व यशोदा यांचे आगमन झाले. त्यांनीही तेथील सर्व व्यवस्थेचे व सजावटीचे कौतुक केले आणि अनय व राधा यांच्याकडे पाहून सहेतुक मान डोलवली. नंद व यशोदा यांच्या बसण्यासाठी उच्चासनांची व्यवस्था होती. थोड्या वेळाने अधिकाधिक मंडळी जमा होऊ लागली. कोणी उत्सुकतेने, कोणी कुतूहलाने, कोणी औपचारिकतेने, कोणी कृतज्ञतेने, कोणी कृष्णप्रेमाने, कोणी नंद व यशोदा यांच्यासाठी, तर कोणी अनय व राधा यांच्याविषयीच्या कौतुकाने असेल, पण येणाऱ्यांची संख्या वाढतच राहिली. सर्व परिसर अगदी भरून गेला होता. लहान मुलांचे इतस्ततः स्वैरपणे बागडणे आणि तरुणांची चाललेली सततची धावपळ यामुळे सर्वत्र चैतन्याचा झालेला संचारच जाणवत होता. हे सर्व पाहून अनय व पेंद्या यांचे चेहरे पुन्हा उत्साहाने फुलून आले. राधेच्याही मुखावरती समाधान झळकले.

त्यानंतर आता काय करावे असा प्रश्न सर्वांच्या मनात निर्माण झाला असता राधेने ईशप्रार्थनेने सुरुवात करावी असे सुचवले असता, सर्वांनीच ती सूचना मान्य केली. राधेने तिच्या हळुवार व मधुर सुरात ईशप्रार्थना म्हणण्यास सुरुवात केली

असता सर्वांनीच आपला सूर तिच्या सुरात मिळवला आणि जुळवला. सर्वांच्या एकमुखी व गंभीर सुरांच्या आळवणीने एक अत्यंत मंगल व पवित्र वातावरण निर्माण झाले. त्यानंतर नानाविध खेळ खेळले जाऊ लागले. अनेक चुरशीच्या स्पर्धा झाल्या आणि विजेत्यांना काहीतरी पारितोषिक नंदाच्या हस्ते देऊन त्यांचे कौतुक करण्यात आले. जोडीजोडीचे खेळ झाले आणि सामुहिक खेळही रंगले. गाण्याच्या भेंड्यांचे कार्यक्रम झाले. अशा तऱ्हेने सर्वत्रच एक जल्लोशाचे वातावरण झालेले होते. सर्वांच्या बोलण्याचा व हसण्याखिदळण्याचा आवाज घुमून राहिला होता. असा बराच वेळ गेल्यानंतर सर्वांनी आणलेले पदार्थ कृष्णाच्या पद्धतीनुसार एकत्र करण्यात आले आणि सर्वांना ते कृष्णाचा प्रसाद म्हणून वाटण्यात आले. तेवढ्यात राधेच्या लक्षात आले की कृष्णाच्या खास आवडीचे तिने केलेले बेसनाचे लाडू घरीच राहिले आहेत. राधेने ताबडतोब पेंद्याला घरी पाठवून ते लाडू मागवून घेतले आणि आठवणीने सर्वांना दिले. महाप्रसादाचे सेवन करून तृप्त झालेली सर्व मंडळी आपापल्या परीने विश्रांती घेण्यासाठी ज्याला जशी जेथे जागा व संधी मिळेल तेथे व तशी पहुडली.

दुपारचा थोडा वेळ विश्रांती घेण्यात गेल्यानंतर विश्रांतीचे रूपांतर आळसामध्ये होण्याच्या आधीच राधेच्या सांगण्यानुसार अनय व पेंद्या यांनी पुन्हा सर्वांना बोलावून एकत्र जमविले. पुन्हा काही काळ वैयक्तिक व एकत्रित गाणी म्हणण्यात गेल्यावर राधेने सूचना केली, की ज्याला कोणाला आपल्या आवडत्या कृष्णाविषयी बोलायचे असेल किंवा त्याच्या काही आठवणी सांगायच्या असतील तर त्याने जरूर बोलावे. ही सूचना सर्वांनाच नवलाईची व जरा गमतीची सुद्धा वाटली. पण बोलायला असे कोणीच तयार होईना. मग राधेने प्रथम नंदालाच आग्रह केला. राधेच्या व सर्वांच्याच आग्रहानुसार नंद बोलावयास उभा राहिला. सुरुवातीला थोडा वेळ नंदाला काही बोलताच येईना. पण हळुहळू तो मोकळेपणाने बोलू लागला. ‘कृष्णाला वसुदेवाने कसे आणून नंदाच्या स्वाधीन केले, त्यावेळेस नंदाची झालेली द्विधा मनःस्थिती, यशोदेपासून ही गोष्ट लपवून ठेवलेली असल्यामुळे मनाची होणारी चलबिचल, त्यानंतर गर्गमुनींनी येऊन सांगितलेले कृष्ण जन्माचे रहस्य व कृष्णाची थोरवी, पुढे कृष्णाकडून अनेक पराक्रम घडलेले पाहून गर्गमुनींच्या सांगण्याची आलेली प्रचिती व पटलेली खात्री, कृष्णाचे अचानक मथुरेला झालेले जाणे आणि आता जाणवणारा त्याचा विरह’ हे सर्व बोलत असताना शेवटी नंदालाही गहिवरून आले आणि त्याला पुढे बोलवेनाच. बोलता बोलता नंद एकदम स्तब्धच झाला आणि त्याची ती अवस्था पाहून सर्वांनाच भरून आले.

त्यानंतर राधेने यशोदेला बोलावयास सांगितले, पण ती तयारच होईना. पण राधेने फारच आग्रह केल्यावर यशोदा उभी राहिली खरी, परंतु ‘माझा कान्हा, माझा कान्हा’ एवढेच शब्द तिच्या मुखातून जेमतेम बाहेर आले आणि तिला मोठा हुंदकाच आला. नेत्रातून वाहू लागलेल्या अश्रुधारांना कसेबसे आवरीत यशोदा खालीच बसली. सर्व वातावरण एकदम गंभीरच झाले. राधेने थोडा वेळ विचार केला आणि ती पेंद्याला म्हणाली, ‘‘अरे पेंद्या, तू तर कृष्णाचा अगदी जिवलग मित्र होतास. मग आम्हाला काही तू तुझ्या किसन देवाविषयी सांगशील की नाही? पेंद्या, मला माहीत आहे की तुला कृष्णाच्या विरहाचे अतिशय दुःख झालेले आहे. पण त्यातून तू आता बाहेर आला आहेस. तेव्हा आम्हाला तुझ्या व कृष्णाच्या काही गमती जमती सांग ना.’’

राधेच्या सूचनेनुसार पेंद्या उभा राहिला खरा, परंतु त्याला काही सुरुवातीला नीट बोलता येईना. अडखळत थोडेसे बोलल्यावर तो राधेकडे केविलवाण्या नजरेने पहात असे. राधा त्याला नजरेच्या व हाताच्या खुणेने वारंवार धीर देई आणि त्याचे बोलणे तसेच पुढे चालू ठेवण्यास सांगत असे. पेंद्याकडे पाहून लोकांना मात्र गंमत वाटत होती आणि त्यामुळे वातावरणही थोडेसे मोकळे झाले. पण मग बोलता बोलता पेंद्याचाही धीर चेपत गेला आणि त्याचे बोलणे हळुहळू स्पष्टपणे व ओघाने होऊ लागले.

'कृष्णाने पहिल्यापासून स्वतःहून पेंद्याशी केलेली मैत्री, पेंद्याची वारंवार केलेली चेष्टा व मस्करी' याविषयी सांगत असताना पेंद्यासह सर्वांचीच हसता हसता अगदी मुरकुंडी वळली. पण पुढे पेंद्या जेव्हा 'कृष्ण त्याची कशी काळजी घेत असे, त्याची भूक कशी सांभाळीत असे, त्याला शारीरिक कष्ट होऊ नयेत म्हणून वेळप्रसंगी त्याला उचलूनही कसे घेत असे' या गोष्टी सांगू लागला तेव्हा मात्र पेंद्यासह सर्वांनाच भरून आले. कृष्णाच्या विरहाचे झालेले दुःख सांगताना तर पेंद्याच्या डोळ्यातील अश्रुधारा थांबायलाच तयार नव्हत्या. पण त्याने लगेचच स्वतःला सावरले आणि तो म्हणाला,

''पण एक निश्चित आहे, की माझ्या ठिकाणचे कृष्णाच्या वियोगाचे दुःख या राधेने तिच्या प्रेमाने भरून काढले. कृष्णाच्या प्रेमाने नेहमी युक्त असलेल्या राधेनेच माझे सांत्वन केले. तिनेच मला नेहमी धीर दिला आणि कृष्णाच्या प्रेमाने सबळ होण्याचा निश्चयही तिनेच मला करावयास लावला. आज एक गोष्ट मी निःशंकपणे सांगतो आहे की मला जे कृष्णाचे प्रेम मिळाले, तेच प्रेम सध्या मला राधेकडून मिळत आहे. तोच आपलेपणा, तीच माझी काळजी आणि तेच प्रेमाने मला सुखविणे. कृष्णाची उणीव अशी कधी या राधेने मला भासूसुद्धा दिली नाही. त्याहीपेक्षा महत्त्वाचे म्हणजे राधा आता मला मनानेही सबळ करीत आहे. आजचा हा कृष्णजयंतीचा कार्यक्रम असा सर्वांनी मिळून साजरा करण्याचा विचार, त्याचा ध्यास, त्याची योजना आणि त्यासाठीचे सर्व कष्ट राधेचेच आहेत. आम्ही आपले तिला थोडीबहुत मदत केली एवढेच. परंतु याचे सर्व श्रेय मात्र केवळ राधेचे आणि राधेचेच आहे याविषयी जराही शंका नाही. मला तर असे ठामपणे वाटते की कृष्णाने राधेला आपल्यासाठीच गोकुळात ठेवलेले आहे. राधेच्या रूपाने कृष्णच या गोकुळात राहिला आहे याविषयी माझी तरी पक्की खात्री आहे. आपण सर्वांनीच हे ध्यानात ठेवले पाहिजे आणि राधेचा तसा उपयोग करून घेतला पाहिजे.''

बोलता बोलता पेंद्याच्या बोलण्याचा वेग व आवेग एवढा वाढला की शेवटी त्याच्या तोंडातून शब्दच बाहेर फुटेना. त्याच्या चेहऱ्यावरतीसुद्धा एक वेगळीच चमक आलेली होती आणि त्याचे डोळेही अत्यंत भावपूर्ण झालेले होते. तशाच अवस्थेत पुढे काहीही न बोलता पेंद्या खाली बसला आणि सर्वांनीच करताली नादाने पेंद्याचे कौतुक केले. बोलून बोलून धाप लागलेल्या आणि घसा कोरडा पडलेल्या पेंद्याला राधेने प्रथम आपल्या हाताने पाणी पाजले आणि त्याची पाठ पुन्हा पुन्हा थोपटून त्याला शाबासकी दिली. त्या नंतर राधेने अनयाकडे सूचक दृष्टीने पाहिले असता अनय उठून उभा राहिला आणि थोडासा पुढे सरसावला. अत्यंत सावकाशपणे व गंभीर सुरात अनयाने बोलावयास सुरुवात केली.

सुरुवातीचे अनयाचे बोलणेही तसे गंभीरच होते. त्याने प्रांजळपणाने सर्व काही सांगितले. 'कृष्ण अगदी लहान असताना त्याच्याविषयी असलेला लळा व प्रेम, पुढे राधेच्या निमित्ताने मनात आलेली शंका, त्या शंकाग्रस्त अवस्थेत त्याने राधेचा केलेला छळ व कृष्णाला दिलेला त्रास' हे सर्व अनयाने मोकळेपणाने सांगितले. 'पण त्याही अवस्थेत कृष्णाचे

त्याच्यावरील प्रेम व आपलेपणा कायमच होता' हेही अनयाने आवर्जून सांगितले. पण 'कृष्णाचे ते प्रेम कळण्याची व घेण्याची मनाची अवस्था नसल्यामुळे त्याच्या मनाला अनन्वित यातना झाल्या' याचीही कबुली अनयाने दिली. 'कालियाच्या तावडीत सापडलेला असताना कृष्णाने कसे साक्षात मृत्यूच्या दाढेतूनच आपल्याला सोडवून आणले' हे सांगताना मात्र अनयालाही भरून आले आणि त्याच्या डोळ्यात पाणीच आले. 'कालियाच्या निमित्ताने कृष्णाने जणू मलाच निर्विष केले आणि त्यानंतर कृष्णाचे प्रेमरूपी अमृत मला सेवन करावयास मिळाले' याचाही उल्लेख अनयाने कृतज्ञतापूर्वक केला. 'त्यानंतर घडलेला कृष्णाचा नित्य सहवास, अनुभवलेले कृष्णाचे प्रेम आणि कृष्णाचे मिळालेले व्यक्तिगत मार्गदर्शन' याचेही अनयाने थोडक्यात वर्णन करून सांगितले.

सर्वांत शेवटी पेंद्याच्या भाषणाचा उल्लेख करून अनय म्हणाला, ''आपला पेंद्या मघाशी अतिशय भावनेने बोलला होता. त्याचे मला अत्यंत कौतुकच वाटले. कृष्णाच्या प्रेमानेच तो एवढा भावनात्मक झाला होता हेही मला ठाऊक आहे. पण मला तरी असे निश्चितपणे वाटते, की अशा तऱ्हेने मनाने दुर्बल होऊन राहणे योग्यच नव्हे. आपणा सर्वांच्या ठिकाणी जे काही कृष्णाचे प्रेम आहे, त्याचे स्मरण ज्याने त्याने ठेवावे आणि त्या प्रेमाचे बळही आता ज्याने त्यानेच घ्यावे. त्यासाठी कोणीही कोणावर अवलंबून राहण्याची आता तरी आवश्यकता नाही. तशी कोणी कोणाची जबाबदारी घेऊही शकणार नाही आणि ती तशी घेणे योग्यही होणार नाही. कारण त्यामुळे उगाचच आपल्यामध्ये तरतम भाव निर्माण होईल. निदान मला तरी तशी दुसऱ्या कोणाची जरुरी मुळीच नाही. कृष्णाच्या प्रेमाने व सहवासाने माझे जीवन समर्थपणे जगण्याचे बळ मला निश्चितच प्राप्त झाले आहे आणि तसे ते मी जगीन याची मला पूर्ण खात्री आहे.''

अनयाचे बोलणे अनेकांना आवडले कारण ते त्यांना मानवणारे होते. म्हणून त्यांनी माना डोलवून अनयाचे कौतुकही केले. त्या नंतर काही काळ सर्वजण स्तब्धच राहिले. पुढे येऊन बोलण्यासाठी कोणी उठेचना. तेव्हा मात्र सर्वांच्या नजरा एकीएक राधेवर खिळल्या. आता फक्त राधेनेच बोलावे किंवा आता राधाच बोलणार असाच सर्वांचा भाव झाला होता. तोच भाव राधेच्याही ठिकाणी एकवटला आणि स्वयंस्फूर्तीने राधा उठून उभी राहिली. राधेने आपले नेत्र मिटून घेतले मात्र, एका क्षणात तिच्या अंतरातील दाटलेले कृष्णप्रेम नेत्रातून वाहू लागले. अंतरातील कृष्णमूर्तीला राधेने भक्तिभावाने वंदन केले. राधेने आपले नेत्र उघडून सर्वांकडे प्रेमळ नजरेने पाहिले आणि आलेल्या प्रत्येकाच्या उपस्थितीची आपल्या दृष्टीनेच दखल घेऊन दाद दिली. आपले दोन्ही हात जोडून राधेने सर्वांना नमस्कार केला आणि धीरगंभीर व हळुवार स्वरात राधेचा भाव साकार होऊ लागला.

*****

# राधेचा कृष्णभाव

"**हे** नंदराज, हे यशोदामाई आणि सर्व गोकुळवासीयांनो, आज आपण सर्वजण एकीएक कृष्णाच्या प्रेमानेच कृष्णजयंतीच्या निमित्ताने येथे जमलो आहोत. या कार्यक्रमाची योजना कोणी केली, त्यासाठी प्रयत्न कोणी केले आणि या सर्वांचे श्रेय कोणाला आहे या गोष्टी दुय्यम आहेत. खरे तर या गोष्टींना महत्त्वच नाही. कारण आपणा सर्वांच्या ठिकाणचे कृष्णप्रेम हे एकीएकच आहे आणि तीच गोष्ट सर्वात महत्त्वाची आहे. त्यामुळेच येथे कोणीही कोणाचे स्वागत करण्याची जशी जरुरी नाही, तसेच कोणी कोणाचे आभार मानण्याचीही जरुरी नाही. आपण सर्वच अभिनंदनास पात्र आहोत. म्हणूनच मी आपणा सर्वांचे अभिनंदन करते आणि आपणा सर्वांना येथे आलेले पाहून झालेला माझा आनंद व्यक्त करते. कारण तुमच्या सर्वांच्या रूपाने कृष्णाचे प्रेमच येथे साकार झालेले आहे असाच अनुभव मला येत आहे. मग जर कृष्णप्रेम येथे प्रगट आहे, तर कृष्ण येथे नाही आणि तो आपल्या सर्वांना सोडून गेला असे कसे बरे म्हणता येईल? निदान मी तरी तसे म्हणूच शकणार नाही. कारण 'कृष्ण हा काही त्याच्या केवळ देहाच्या अस्तित्वापुरता मर्यादित नाही' असे तो स्वतःच आपणास वारंवार सांगत असे.

कृष्ण म्हणजे प्रेम, कृष्ण म्हणजे सर्वांविषयीचा आपलेपणा, कृष्ण म्हणजे सर्वांच्या हिताची काळजी, कृष्ण म्हणजे कळवळा, कृष्ण म्हणजे प्रामाणिकपणा, कृष्ण म्हणजे निष्ठा, कृष्ण म्हणजे त्याग, कृष्ण म्हणजे ध्यास, कृष्ण म्हणजे प्रीती, कृष्ण म्हणजे भक्ती, कृष्ण म्हणजे सर्व ज्ञान, कृष्ण म्हणजे आनंद, नव्हे नव्हे, कृष्ण म्हणजे तर परमानंदच! जे जे म्हणून ईश्वरी गुण आहेत ते सर्व म्हणजे कृष्ण. म्हणूनच कृष्ण हा सामान्य मनुष्यच नव्हता, तर तो साक्षात ईश्वराचा अवतार होता हे त्याचे माहात्म्य आपण सर्वांनीच नेहमीच लक्षात ठेवले पाहिजे. या त्याच्या माहात्म्याचे केव्हाही व कशानेही आपल्याला विस्मरण होऊ दिले नाही पाहिजे. कृष्णप्रेम व कृष्णमाहात्म्य या दोन्हीची जागृती आपल्याठायी सतत असेल, तर आपला कृष्ण आपल्याजवळच आहे असे नक्की समजा. मग त्याच्याच प्रेमाचा अनुभव आपल्याला नित्य येत राहील आणि आपले सर्व जीवनच आनंदाचे होऊन राहील.

हे गोकुळवासीयांनो, या कृष्णाचे आपल्यावर अनंत उपकार आहेत, की त्याने आपल्याला आपल्या ईश्वराशी असलेल्या नात्याची ओळख करून दिली. सर्व नात्याच्या पलीकडे असलेल्या त्या ईश्वरी नात्याचा अनुभवही कृष्णानेच आपल्याला आणून दिला. त्यासाठी त्याने आपणा सर्वांशी प्रेमाचे नाते जुळवले. ईश्वरस्वरूप कृष्णाचे प्रेम हेच ते ईश्वरी प्रेम होते. त्यामुळे साहजिकच कृष्णप्रेमामुळे आपले ईश्वराशी नाते जुळले. कृष्णाच्या प्रेमरूपाने आपण सर्वजण त्या ईश्वराचेच प्रेम अनुभवत होतो. त्या प्रेमातून आपल्या ठिकाणी जे प्रेम निर्माण झाले तेही ईश्वरी प्रेमच होते. याची जाणीवही कृष्णानेच आपल्याला करून दिली. एवढेच नव्हे, तर त्या प्रेमाचा अनुभव आपल्याला घेता यावा म्हणून कृष्णाने आपल्या प्रेमाचा स्वीकार केला. ही तर त्याची आपल्यावरील केवढीतरी कृपाच आहे. कारण म्हणूनच आपल्याला आपल्या

ठिकाणच्या प्रेमाचा थोडा फार आनंद अनुभवता आला. म्हणूनच कृष्ण आज प्रत्यक्ष देहाने आपल्यामध्ये नसला आणि ईश्वरी संकेतानुसार पुढेही एखादे वेळेस आपली त्याच्याशी भेट होणारही नाही, तरी सुद्धा त्याच्या रूपाने अनुभवलेले ईश्वरी प्रेम आपल्या सर्वांच्या अंतःकरणात नित्य खेळत राहील आणि आपल्या अंतरंगात रंगत राहील. आजच्या सारख्या काही निमित्ताने वा कारणाने ते बाह्यांगाने प्रगट होईल तेव्हा त्याचे विविध रंग आपल्याला दिसतील. परंतु त्यातील मूळ रंग एकच आहे.

आज सुद्धा अनेकांनी आपले कृष्णावरचे प्रेम विविध अंगांनी व रंगांनी प्रगट केले. कोणी बोलून असेल, कोणी गाऊन असेल, कोणी खेळून असेल, कोणी पाहून असेल, तर कोणी ऐकून असेल, पण सर्वजण आज या कृष्णजयंतीच्या सोहळ्यामध्ये सहभागी झाले. त्याहीपेक्षा महत्त्वाचे म्हणजे सर्वजण समरस झाले. कारण आपल्या सर्वांच्या ठिकाणी एकच रस आहे आणि तो म्हणजे कृष्णप्रेमरस होय. तो प्रेमरस मात्र आपल्या ठिकाणी कायम राहणार आहे आणि त्यामुळे आपले अंतःकरणही एखाद्या रसरशीत फळाप्रमाणे होऊन राहील. अशा प्रेमाने नित्य भरलेल्या आणि प्रेमाच्या संतृप्त अवस्थेत असलेल्या आपल्या अंतःकरणात मग सदैव शांती, समाधान व आनंद यांचाच वास असेल. त्या प्रेमाचाच सुवास नित्य दरवळत राहील आणि आपल्याला नेहमी आनंदीत व प्रसन्न करून ठेवील. ही सर्व किमया ज्या आपल्या अत्यंत प्रिय अशा कृष्णामुळे झाली, त्या कृष्णाच्या नित्य ऋणांत राहण्यातच आपल्या जन्माची सार्थकता आहे आणि जीवनाची धन्यता आहे. त्यासाठी ईश्वराने आपल्या सर्वांनाच 'सदैव कृष्णाच्या प्रेम व माहात्म्याच्या स्मरणात ठेवावे आणि आपण सर्वांनी नेहमीच कृष्णचरणी लीन असावे' एवढीच प्रार्थना मी आपल्या सर्वांच्या वतीने त्या ईश्वराच्याच चरणी करते. आपण सर्वांनी मला मनःपूर्वक साथ द्यावी अशी आपल्या सर्वांना विनंती करते.''

राधेने आपले बोलणे थांबवता थांबवताच आपले नेत्र मिटून हात जोडले आणि तिच्या मुखातून आळवणीचे आर्त सूर बाहेर पडू लागले. हळुहळू स्वर लहरींबरोबर शब्दही बाहेर आले आणि दैवी संगीताचे एक गीत राधेकडून प्रगट होऊ लागले.

''शाम, मुकुंद, मुरारी,
पुरुषोत्तम हा जगदोद्धारी ||

प्रेमशांतीचे राज्य असावे,
कृष्णचरणी आम्ही लीन असावे ||
शाम, मुकुंद, मुरारी ||

प्रेम, भक्ती, आनंद असावा,
कृष्ण नित्य स्मरणी असावा ||
शाम, मुकुंद, मुरारी ||

राधेच्या अंतःकरणापासून स्फुरून येत असलेला हा नाद स्वरांच्या साहाय्याने शब्दरूप घेत होता आणि राधेच्या अंतरातील सर्व भावपूर्णता साकार होत होती. तो भाव स्वरांच्या व शब्दांच्या माध्यमातून सर्वांच्या मनाला स्पर्शीत होत होता आणि त्यांचीही मने भावपूर्ण झाली होती. त्यामुळे राधेच्या नादाचे निनादही सर्वांच्याच मनात घुमू लागले. त्या निनादाचे सूरही प्रगट होऊ लागले आणि राधेच्या सुरांमध्ये हळुहळू मिसळू लागले. मिसळता मिसळता ते सूर एकमेकांना मिळू लागले आणि मिळता मिळता राधेचे सूर आणि बाकी सर्वांचे सूर एकमेकांत जुळले सुद्धा. राधा अत्यंत भावपूर्णतेने पुन्हा पुन्हा आळवीत होती आणि सर्वजण अगदी सहजपणे तिला साथ देऊन तिच्या बरोबरीने केव्हा गाऊ लागले हे कोणालाच कळले नाही. राधेची भावपूर्णता जशी जशी उत्कट होत होती, तसा तसा तिचा सूरही अधिकाधिक आर्त व उच्च होत होता. शेवटी राधेच्या भावाच्या उत्कटतेची परमावधी झाली आणि राधेची आळवणी अचानक थांबली. तरीही बाकी सर्वजण मात्र अजून त्याच भावाच्या व सुरांच्या धुंदीत होते आणि तसेच गात होते.

राधेच्या गीतातील ओळी पुन्हा पुन्हा सर्वजण म्हणतच राहिले होते आणि शेवटी शेवटी तर 'शाम, मुकुंद, मुरारी. शाम, मुकुंद, मुरारी' एवढेच शब्द सर्वांच्या मुखातून येत राहिले. सर्वांनी करताली वादनाने ताल आधीपासूनच धरलेला होता. कृष्णप्रेमाच्या त्या नादात सर्वांचीच मने तेवढा वेळ पूर्ण लय पावली होती. परंतु थोड्या वेळाने सर्वांच्याच मनाची धुंदी हळुहळू ओसरली आणि सर्वजण एकदम देहभानावर आले. काय झाले ते सर्वांच्याच लक्षात आले. थोडा वेळ अनुभवलेल्या आनंदाचे आगळे वेगळेपण सर्वांनाच जाणवले होते. त्याच जाणिवेने व दृष्टीने आता सर्वजण राधेकडे पाहू लागले आणि त्यांनी राधेचेही विशेषत्व ओळखले. त्याची दाद व राधेचे कौतुक व्यक्त करण्यासाठी म्हणून मग सर्वांनीच करतालीचा जोरदार नाद प्रगट केला. राधेनेही प्रेमाने हसून आपले दोन्ही हात जोडून सर्वांना नमस्कार केला आणि सर्वांनी केलेल्या अभिनंदनाचा नम्रतेने स्वीकार केला.

हे लक्ष्मी, अशा तऱ्हेने त्या वृंदावनामध्ये सर्वांच्याच मनाच्या अवस्थेने आनंदाची उंची गाठली असतानाच अचानक पेंद्या पुढे आला. त्याच्या हातातील मुरली बघून सर्वांनाच नवल वाटले. राधेलाही आश्चर्याचा धक्काच बसला. कारण ती तर राधेने देव्हाऱ्यात ठेवलेली कृष्णाचीच मुरली होती. राधेने प्रश्नार्थक मुद्रेने पेंद्याकडे पाहिले असता पेंद्याने राधेकडे पाहून किंचित हसून आपले डोळे मिचकावले. राधेने लगेचच ओळखले की तिने जेव्हा घरी राहिलेले बेसनाचे लाडू आणण्यासाठी म्हणून पेंद्याला घरी पाठवले होते तेव्हाच येताना पेंद्याने ही मुरली त्याच्याबरोबर आणली असणार. राधेला जरी पेंद्याचा राग आला नाही, तरी तिला न विचारता व न सांगताच पेंद्याने अशी ती मुरली तेथे आणावी हे तिला आवडले नाहीच. कारण ती मुरली तिच्यासाठी अगदी तिच्या जिवाभावाची व कृष्णप्रेमभावाची होती. पण काहीही न बोलता राधा फक्त पेंद्याकडे पहातच राहिली. पेंद्याही थोडासा वरमलाच. त्यालाही जरासे ओशाळल्यासारखेच झाले. परंतु तरीही धीर करून पेंद्या पुढे आला आणि आपले दोन्ही हात जोडून राधेला म्हणाला,

''राधे, पहिल्या प्रथम मी तुझी क्षमाच मागतो. तुला विचारल्याशिवाय मी ही कृष्णाची मुरली येथे आणावयासच नको होती. परंतु मी खरेच सांगतो की माझाही अगदी नाईलाजच झाला. त्याचे काय झाले. बेसनाचे लाडू तुझ्या घरून आणण्यासाठी तू मला तुझ्या घरी पाठवलेस खरे, पण मला ते सर्व घर शोधूनही कोठे मिळेचनात. शेवटी मी देवघरात गेलो, तर तेथेच ते लाडू ठेवलेले होते. म्हणूनच एखादे वेळेस सकाळी गडबडीत ते लाडू येथे आणण्याचे राहून गेले असावे. बेसनाच्या लाडवाची टोपली तेथून उचलत असताना माझी नजर एकदम देव्हाऱ्यातील या कृष्णाच्या मुरलीवर गेली. माझ्या मनात एकदम विचार आला की 'आज कृष्णजयंतीच्या दिवशीच जर या मुरलीचे वादन ऐकावयास मिळाले तर ते अगदी आनंदाचे व योग्यही होईल.' या विचाराने माझ्या मनाचा एवढा ताबा घेतला की मग मला चैनच पडेना. तेव्हा आधी मी देव्हाऱ्यातील देवाला नमस्कार केला आणि मग मोठे धाडस करून ती मुरली तेथून उचलून येथे घेऊन आलो.

सकाळी आणल्यापासून ती मुरली माझ्या अंगरख्यात लपवून ठेवली होती. योग्य वेळ येताच ती मुरली तुला देऊन ती वाजवण्यासाठी मी तुला विनंती करणार होतो. राधे, मला वाटते ती योग्य वेळ आता आली आहे. आत्ताच तू जे कृष्णप्रेमाने युक्त होऊन कृष्णमाहात्म्याविषयीचे बोल प्रगट केलेस आणि त्यानंतर तर तू जे कृष्णप्रेमाचे अत्यंत मधुर गीत गायलेस, त्यांनी तर आम्ही सर्वच जण एवढे भारावलो गेलो होतो की विचारायची अगदी सोय नाही. ज्या आनंदाचा अनुभव तू आम्हाला आणून दिलास त्याचे वर्णन करायला तर आमच्यापैकी कोणापाशीही काहीही शब्दच नाहीत. अशा या अत्यंत आनंददायी सोहळ्याचा शेवट राधे, तू ही कृष्णाची मुरली वाजवून करावास एवढी एकच तुला अत्यंत प्रेमाची प्रार्थना आहे. आज कृष्णजयंतीच्या दिवशी पुन्हा एकदा कृष्णाच्या मुरलीचा नाद या गोकुळात घुमावा एवढीच माझी इच्छा आहे. राधे, तुझे मुरलीवादन हे तुझे वैयक्तिक आहे. ते माझ्याशिवाय दुसऱ्या कोणालाही ठाऊक नाही. तुझे हे मुरलीवादनाचे गुह्य प्रगट केल्याबद्दल मी तुझी पुन्हा क्षमा मागतो. त्यासाठी तू मला जी काही शिक्षा करशील ती भोगण्यास मी तयार आहे. परंतु कृपा करून ती शिक्षा आता न करता पुन्हा केव्हा तरी कर. आता मात्र माझा अत्यंत नाईलाज होत आहे. तुझे मुरलीवादन ऐकण्यासाठी मी अत्यंत बेचैन आहे.''

असे म्हणून पेंद्याने आपल्या हातातील मुरली राधेच्या हातात दिली. राधेनेही ती मुरली प्रेमाने हसून आपल्या हातात घेतली अणि तिला आपल्या हृदयाशी धरून आपले डोळे मिटून घेतले. सर्वजण राधेच्या त्या ध्यानाकडे अत्यंत उत्सुकतेने एकटक नजरेने पाहू लागले.

राधा काही काळ तशीच डोळे मिटलेल्या अवस्थेतच उभी राहिली. कृष्णाची मुरली आपल्या हृदयाशी धरून राधा जणू तिच्या हृदयातील कृष्णमूर्तीला कौलच लावीत होती. राधेचा हृदयस्थ कृष्ण तर तिच्या हृदयात बसून नित्यच मुरलीवादन करीत असे. त्याचीच प्रेरणा जणू राधेच्या हातातील कृष्णाच्या मुरलीला मिळाली असावी. राधेने अगदी सहजपणे हातातील मुरली अपल्या ओठावर ठेवली. तिच्या हाताची बोटे मुरलीच्या छिद्रांवर अलगदपणे हालचाली करू लागली आणि एकदम त्या मुरलीतून उत्स्फूर्तपणे अमृताहूनही गोड असे सूर बाहेर येऊ लागले. ऐकणाऱ्यांचा आपल्या

कानावर विश्वास बसण्याच्या आतच अनेक सुरांची सुरावट सजू लागली आणि एक अत्यंत आगळी वेगळी पण अत्यंत मधूर अशी धून घुमू लागली.  मंत्रमुग्ध होऊन ऐकताना सर्वजण करताली वाजवून कधी साथ देऊ लागले हे कोणाच्याही लक्षातच आले नाही.  पण सर्वांचेच देहभान हळुहळू हरवले हे मात्र खरे.  सूर व तालांचा घडणारा तो संयोग म्हणजे राधा व कृष्ण यांच्या घडलेल्या संगमाचेच ते द्योतक होते.

राधेच्या मुरलीतून येणारे प्रेमाच्या आर्ततेचे सूर हळुहळू आवाजाची उंची गाठत होते.  जशी जशी राधेची आर्तता वाढत होती तसा तसा मुरलीचा स्वर अधिकाधिक वरच्या स्तरावर जात होता.  शेवटी शेवटी तर त्या स्वरलहरींनी एवढी उंची गाठली की त्या जणू आकाशालाही भेदून गेल्या असाव्यात.  कारण आकाशात अचानकपणे हळुहळू शामल मेघ जमून दाटी करू लागले आणि क्षणार्धात त्या दाटलेल्या मेघातून जलाची बरसात सुरू झाली.  पृथ्वीवरून घुमत घुमत वर वर आकाशात जाणारी मुरलीच्या मधुर सुरांची बरसात आणि आकाशातून हळुवारपणे खाली खाली येणारी शीतल जलाची बरसात हा तर या सृष्टीत घडणारा एक अभूतपूर्व चमत्कारच होता.  त्या दोन्ही बरसातीच्या संगमात अंतर्बाह्य सर्वांगाने न्हाऊन निघणारे ते गोकुळवासी खरेच अत्यंत भाग्यवान ठरले.  सर्वांच्या मुखातून अचानकपणे एकदमच भावपूर्ण शब्द त्या सूरतालांच्या साहाय्याने बाहेर पडू लागले.  **''जय राधाकृष्ण, जय राधाकृष्ण, जय राधाकृष्ण''**



*****

# लक्ष्मीचा तृप्तभाव व नारदाचे सांगणे

**स**गुण प्रेमभक्तिचे माहात्म्य सर्वांगाने व सर्वार्थाने प्रगट करणारा असा राधा व कृष्ण यांच्या ऐक्यत्वाचा कथा प्रसंग, सगुण प्रेमभक्तिभावाचे प्रतीक असलेल्या अशा प्रत्यक्ष नारदाच्या मुखातून ऐकताना लक्ष्मी अगदी तृप्तच होऊन राहिली होती. पुढे काहीही विचारण्याच्या, बोलण्याच्या किंवा ऐकण्याच्या जराही मनःस्थितीत लक्ष्मी दिसतच नव्हती. परंतु नारदाचे सांगणे अजून पूर्ण झालेले आहे असे त्याच्या मुखावरील भावावरून मात्र वाटत नव्हते. त्यामुळे नारद लक्ष्मीकडे प्रश्नार्थक मुद्रने पहातच राहिला होता. नारदाचे असे पाहणे लक्ष्मीच्या आधी लक्षातच आले नाही. पण जेव्हा ते आले तेव्हा लक्ष्मीला थोडेसे नवलच वाटले. म्हणून ती नारदाला म्हणाली,

''हे नारदा, तुझे बोलणे अजून संपलेले नाही असे वाटते. तसे ते अगदी साहजिकच आहे. कारण सगुण प्रेमभक्तिचे अखंड गायन तुझ्या अंतःकरणात नित्य चालू असते. ते कधीही पूर्ण होणे शक्यच नाही. परंतु राधा व कृष्ण यांच्या अभूतपूर्व अशा ऐक्यत्वाची कथा ऐकून माझे मन मात्र आनंदाने अगदी तृप्त झाले आहे. यापेक्षा काही सरस व सुरस असे पुढे काही खुद्द कृष्णचरित्रातही घडले असेल असे मला तरी वाटत नाही. मथुरेला गेल्यावर कृष्णाकडून नक्कीच पराक्रम घडला असणार. त्याने कंसाचा वध केला असणारच. वसुदेव व देवकी यांची सुटकाही कृष्णाने नक्कीच केली असणार. कृष्णाचे पुढील सर्व जीवनही नक्कीच अत्यंत रोमहर्षक व दैदीप्यमान झाले असणार. त्याला नाना तऱ्हेच्या अनेक व्यक्तीही भेटल्या असणार. त्या सर्वांनी कृष्णाचे प्रेम अनुभवले असणारच आणि अगदी कृष्णानेही त्या सर्वांचे प्रेम अनुभवलेच असणार. मला याविषयी जराही शंका नाही. परंतु एक गोष्ट मात्र माझ्या मनात पक्केपणाने ठसलेली आहे की यापैकी कशालाही राधा व कृष्ण यांच्या प्रेमाची सर येणे शक्यच नाही. नारदा, मला तर असे खात्रीपूर्वक वाटते, की राधा ही कृष्णचरित्राचा कळसच झाली आणि कळस झाल्यानंतर मग कृष्णचरित्रात जे काही पुढे घडले असेल ते त्या कळसापेक्षा उंच व उच्च असणे शक्यच नाही. हो की नाही?''

लक्ष्मीच्या बोलण्यावरती लगेचच हसून नारद म्हणाला, ''हे लक्ष्मी, कळसापेक्षा उंच काहीच नसते हे तुझे म्हणणे जरी बरोबर असले तरी 'राधा हाच कृष्णचरित्रातील कळस होता' हे तुझे म्हणणे मात्र योग्यच नाही. यात तुझ्या ठिकाणी राधेचे जरी कौतुक दिसत असले, आणि ते योग्यच आहे म्हणा, तरीही कृष्णमाहात्म्याच्या दृष्टीने मात्र ते वर्णन यथार्थ होत नाही. कारण कृष्णमाहात्म्य हे काही केवळ राधेपुरतेच मर्यादित नव्हते. ते तसे असणेही शक्यच नाही. कृष्णचरित्र पुढे केवढे तरी घडले. ते न ऐकताच व न जाणताच असे विधान करणे हे योग्यच नव्हे. राधेच्या माहात्म्याने तुझ्या मनाला तृप्ती आली आहे. पण कृष्णमाहात्म्याची व्यापकता व सखोलता मात्र अजून तुझ्या ठिकाणी निर्माण झालेली नाही याचेच हे लक्षण आहे. राधेचे माहात्म्य तुझ्या मनात पक्केपणाने ठसलेले आहे हे खरे, परंतु कृष्णमाहात्म्य जाणल्यानेच तुझ्या ठिकाणी पक्वता येईल आणि त्या माहात्म्याच्या स्वानुभवाने तर तू परिपक्वच होऊन राहशील.

लक्ष्मी, राधेचेही माहात्म्य तू जाणले आहेस असे जे तुला वाटत आहे, तेही तू पूर्णपणे व यथार्थतेने जाणले आहेस का? कृष्णाच्या सर्वांवरील प्रेमामुळे व त्याने सर्वांना देऊ केलेल्या सख्यत्वामुळे गोकुळात सर्वांनाच संधी प्राप्त झाली होती. मग ती इतरांना का साधता आली नाही आणि राधेनेच कशी साधली? राधेचे असे काय आगळे वेगळेपण होते की ज्यामुळे ती कृष्णाची खऱ्या अर्थाने भक्त होऊन राहिली? आपल्याला व्यक्ति-व्यक्तिंची तुलना करायची नाही आणि तुलनात्मक श्रेष्ठत्व हे खरे श्रेष्ठत्वच नव्हे. परंतु भावाच्या वेगवेगळ्या अवस्थांना जाणून घेण्यासाठी त्या त्या भावाच्या व्यक्तींचा व कृतींचा विचार करावाच लागतो. अशा निरनिराळ्या अवस्थांच्या अभ्यासाचीच परिणती भक्तिभावाच्या ध्यासामध्ये होते. तेव्हा राधेचेही माहात्म्य योग्य अभ्यासाने यथार्थपणे जाणून घे, त्याचाच निश्चय कर आणि त्याचाच ध्यास धर. म्हणजे मग तुला राधेच्या अवस्थेचा अनुभव तर घेता येईलच, पण कृष्णाच्या व्यापक चरित्राकडे पाहण्याची मुलभूत दृष्टी तुला प्राप्त होईल.

हे लक्ष्मी, तुझ्याच शब्दात म्हणायचे झाले तर असे म्हणता येईल की 'कृष्ण हा राधेच्या जीवनाचा 'कळस' झाला, तर राधा ही कृष्णचरित्राचा 'पाया' ठरली.' त्या अत्यंत सखोल पायाच्या आधारावरच पुढे केवढे तरी भव्य व दिव्य असे कृष्णचरित्राचे मंदिर उभारले गेले. मग त्या मंदिरावरसुद्धा कळस हा असणारच की नाही? परंतु तो कळस गाठण्यासाठी आपल्याला कृष्णचरित्राच्या त्या विशाल, सुरेख व रमणीय अशा मंदिरात आधी प्रवेश करावा लागेल. त्याशिवाय त्या कृष्णचरित्रातील सौंदर्य व गुह्य आपल्याला अनुभवता येणारच नाही. त्या अनुभवानेच राधा व कृष्ण यांची खरी सांगड आपल्याला कळेल. राधा तिच्या अनुभवाने पूर्ण झाली होती. पण कृष्णाचा अनुभव हा परिपूर्ण होता आणि तोच त्याच्या संपूर्ण जीवनात नित्य प्रगट होत राहिला. कृष्णाच्या त्या जीवनातही सगुण प्रेमाचेच सूत्र होते हे निश्चित. पण त्या प्रेमसुत्रात कोण कोण, कसे कसे व किती किती गुंतले गेले, बांधले गेले आणि गुंफले गेले याचे गायन करणे व ऐकणे हे अतिशय प्रेमाचे, भक्तीचे व आनंदाचे होणार आहे.''

नारदाचे बोलणे ऐकून लक्ष्मी आधी एकदम चकितच झाली आणि मग थोडीशी बावरलीसुद्धा. ज्याला आपण मनाची तृप्ती म्हणत होतो ती तृप्ती नसून मनाला थोडीशी सुखाची सुस्तीच आली होती हे लक्ष्मीच्या लक्षात आले. त्याची लक्ष्मीला खंतच वाटली. पण ती लगेचच सावधही झाली. ''श्रवणाचे सुख घेता घेता त्यातून निर्माण होणारे सगुण प्रेम हे मनात अधिक सखोल शिरून त्याने अंतःकरणाचा अधिकाधिक ठाव घ्यावयास हवा. असे घडेल तर त्या श्रवणामुळे मन तृप्त होऊन शांत न बसता ते तृप्त राहून अधिकच आर्त होत राहील'' ही नारदाने दाखवलेली खूण लक्ष्मीच्या लक्षात आली आणि ती अंतर्मुखच झाली. लक्ष्मीच्या त्या अंतर्मुख अवस्थेकडे पहात नारद स्वस्थ बसून राहिला होता. त्याने मुद्दामच काही वेळ जाऊ दिला. थोड्या वेळाने लक्ष्मी स्वतःहूनच नारदाशी बोलू लागली.

*****

## लक्ष्मीचे मनन चिंतन

“**हे** नारदा, तुझे म्हणणे अगदी बरोबर आहे आणि ते मला विचारही करायला लावणारे आहे. कारण एखादा इतरांपेक्षा केवळ वेगळा आहे म्हणून श्रेष्ठ ठरत नाही, पण जो श्रेष्ठ असतो तो मात्र इतरांपेक्षा वेगळा दिसतोच. राधेचे श्रेष्ठत्व तिने कृष्णाशी साधलेल्या ऐक्यत्वामुळेच आहे हे तर अगदी स्पष्ट आहे. असे ऐक्यत्व होण्यासाठी राधेकडून कृष्णाची प्रत्यक्ष भक्ती घडली हे जरी खरे असले, तरी असे ऐक्यत्व साधण्यासाठी काही राधेने कृष्णाची भक्ति केलेली नाही. तर राधेकडून घडलेल्या कृष्णाच्या भक्तिमुळे ती कृष्णाशी सहजपणे ऐक्य पावली हे सत्य आहे. असा भक्तिभाव राधेच्या ठिकाणी कृष्णाविषयीच्या आत्यंतिक प्रेमातूनच निर्माण झाला आणि कृष्णाविषयी एवढे प्रेम राधेच्या ठिकाणी निर्माण होण्याचे मूळ कारण म्हणजे कृष्णाचे राधेवरील असलेले प्रेम हेच होते हेही खरे आहे. पण असे प्रेम तर कृष्णाचे सर्वांवरतीच होते. मग सर्वचजण कृष्णाशी ऐक्य का पावले नाहीत हा सुद्धा एक महत्त्वाचाच मुद्दा आहे असे मला आता जाणवत आहे.

‘राधा ऐक्य पावली ना’, मग फक्त राधेच्याच भक्तिभावाला महत्त्व देणे हाच विचार होकारात्मक आहे, इतर जे कोणी कृष्णाशी ऐक्य पावू शकले नाहीत त्यांच्याविषयी काही बोलणेसुद्धा नकारात्मकच विचार आहे असे मला वाटत होते. परंतु भक्तिभावाचा ध्यास जर आपल्याला लागायचा असेल, तर होकारात्मक व नकारात्मक अशा दोन्ही अंगांचा विचार करणे अत्यंत आवश्यक आहे हे तुझे सांगणे मात्र अत्यंत योग्यच आहे. मला ते अगदी मनापासून पटले.

हे नारदा, या दृष्टीने जेव्हा मी तू सांगितलेल्या व दाखवलेल्या काही व्यक्तिरेखांकडे पाहते, तेव्हा मात्र मला त्यांच्या ठिकाणी असलेल्या कृष्णाविषयीच्या भावामध्ये काही तरी कमतरता निश्चितच जाणवते. अर्थात माझे हे बोलणे त्या व्यक्तिंचा कमीपणा दाखवण्यासाठी नसून, अशी कमतरता राधेच्या ठिकाणी असूनही तिने त्याच्यावर तिच्या भावबळाने मात केली हे राधेचे कौतुक सांगण्यासाठी आहे.

सर्वात प्रथम नंदाचा विचार जर केला, कारण गोकुळात त्याचाच प्रथम संबंध कृष्णाशी आला, तर नंदाचा मला आधी अत्यंत मोठेपणाच जाणवतो. वसुदेवाचा पुत्र म्हणून कृष्णाला गोकुळात जाणून बुजून ठेवून घेणे कोणाही सामान्याला कठीणच गेले असते. परंतु नंदाने मात्र फक्त मित्रप्रेमासाठी ही जोखीम पत्करली. ती केवळ बाह्यांगाचीच नव्हती, तर त्यात भावनिक भागही होता. कृष्ण आपला पुत्र नाही हे त्याला माहीत असूनही ती गोष्ट यशोदेपासून लपवून ठेवायची होती. यामध्ये त्याला केवढा तरी भावनिक त्रास हा झाला असणारच. परंतु नंद कधीही व कोठेही अजिबात कमी पडला तर नाहीच, पण कृष्णावरचे त्याचे पितृप्रेम अगदी पुरेपूर प्रगट झाले. कृष्णाचे हट्ट वा लाडकोड पुरवणे असो, किंवा कृष्णाचे पालन पोषण करणे असो, नंदाकडून त्याचे कर्तव्यकर्म कृष्णाविषयीच्या आत्यंतिक आपलेपणापोटी सहजपणाने घडले.

आणखीन एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे गर्गमुनींकडून नंदाला 'कृष्ण हा नारायणाचा अवतार आहे' हे रहस्य जेव्हा कळले, तेव्हापासून त्याची कृष्णाकडे पहाण्याची दृष्टीच बदलली आणि तशी ती शेवटपर्यंत कायम राहिली. त्यामुळे पुढील अनेक प्रसंगात काही वेळा जरी नंदाला कृष्णाचे वागणे वा बोलणे आवडले किंवा मानवले नाही, तरी तो नेहमीच कृष्णाच्या पाठीशी उभा राहिला. अशा तऱ्हेने कृष्णाचे माहात्म्य नंद पूर्णपणे ओळखून होता आणि त्याचे कृष्णावर अत्यंत प्रेमही होते. परंतु तरीही कृष्णाविषयी नंदाच्या ठिकाणी भक्तिभाव निर्माण होऊ शकला नाही. याला कारण म्हणजे त्यांचे नातेच असावे. नंदाचे कृष्णावरील प्रेम हे पितापुत्र या नात्यापुरतेच मर्यादित राहिले. परंतु त्या मर्यादेत मात्र ते अत्यंत उत्कृष्ट होते हे नक्कीच आणि हेच माझ्या दृष्टीने महत्त्वाचे आहे.

हे नारदा, यशोदेची गोष्ट तर अगदीच वेगळी होती. ती तर कृष्णाच्या माहात्म्याविषयी पूर्णपणे अनभिज्ञच होती आणि तिचे कृष्णावरील प्रेमही साहजिकच वात्सल्य भावाचेच होते. म्हणूनच अत्यंत प्रेमाने व वात्सल्याने तिने कृष्णाचे लालन पालन केले. कृष्णासाठी केवढे तरी कष्ट सोसून यशोदेने कृष्णाचे संगोपन करून त्याला वाढवले. त्या यशोदेच्या प्रेमाला दुसऱ्या कशाचीच तोड नाही हे अगदी खरे आहे. यशोदेचे कृष्णावरील प्रेम हेही साधारण नव्हतेच. पण पुत्रप्रेमाच्या मर्यादेतच ते प्रेम राहिले हेही खरे आहे. त्या प्रेमाचे रूपांतर भक्तिमध्ये होणे शक्यच नव्हते आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे यशोदेच्या दृष्टीने ते आवश्यकही नव्हते. नंद व यशोदा कृष्णाशी सख्य करू शकत नव्हते हाही एक मुद्दा विचार करण्यासारखा आहे.

हे नारदा, पेंद्याचे कृष्णावरील प्रेम मात्र खरेच वेगळे होते. त्याला पहिल्यापासूनच कृष्णाच्या मैत्रीचा लाभ मिळाला. हे त्याचे भाग्यच होते. सुरुवातीला एखादे वेळेस जरुरी म्हणून असेल किंवा आधार मिळावा म्हणून असेल, परंतु पेंद्याने जी काही एकदा कृष्णाची कास धरली ती निष्ठेने शेवटपर्यंत धरून ठेवली. त्याच्या ठिकाणी कृष्णाविषयी केव्हाही शंका किंवा राग निर्माण झालाच नाही. याला कारण अर्थातच पेंद्याच्या स्वभावातील भाबडेपणा व निरागसता हेच होते. पण या निरागसतेमध्ये असलेला अज्ञानाचा दोष मात्र पेंद्याच्या ठिकाणी कायम राहिला. त्यामुळे कृष्णाचे खरे ईश्वरी माहात्म्य त्याला आकलन झाले नाही. कृष्णाने पेंद्याला ईश्वराचे अस्तित्व व माहात्म्य सांगण्याचा प्रयत्न केला. परंतु पेंद्याच्या निरागसभावापुढे कृष्णाचाही काही ईलाज चालला नाही. त्यामुळे पेंद्या मनाने दुर्बलच राहिला आणि कृष्ण मथुरेला गेल्यानंतर अत्यंत व्याकूळ व हवालदिल झाला. परंतु एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे पेंद्याने कृष्णाचे खरे प्रेम अनुभवले होते. त्यामुळे राधेच्या भेटीत पेंद्याने तिचे खरे प्रेम मात्र लगेचच ओळखले. पुढे राधेच्या सहवासात राधेचे प्रेम हे कृष्णप्रेमच आहे याची पेंद्याला खात्रीच पटली. एवढेच नव्हे तर पेंद्याला हळुहळू राधेचे माहात्म्यही जाणवू लागले होते हे त्याच्या शेवटी वृंदावनातील वागण्या-बोलण्याने सिद्धच झाले. नारदा, मला तर असे अगदी खात्रीपूर्वक वाटते की पेंद्याने पुढे राधेच्या सहवासात कृष्णमाहात्म्य खऱ्या अर्थाने अनुभवलेही असेल.

हे नारदा, सर्वात अभ्यासाच्या दृष्टीने महत्त्वाचा असा मला अनयच वाटतो. त्याच्या भावातील चढ उतार हे अगदी खरे व प्रामाणिक होते. त्याने आपल्या मनातील वेगळे वेगळे बरे वाईट भाव वेळच्या वेळीच मोकळेपणाने सांगून व बोलून व्यक्त केले नाहीत. त्यामुळे बऱ्याच गोष्टी त्याच्या मनात मळासारख्या साचून रहात असत. मग कधीतरी काहीतरी बाह्य कारणाच्या निमित्ताने त्याच्या मनामध्ये स्फोट झाल्यासारखे होई आणि त्याच्या मनातील राग, द्वेष, मत्सर मिळून सर्व घाण विष होऊनच एकदम जोराने बाहेर पडत असे. त्याचा त्रास इतरांना तर होईच, पण मुख्य म्हणजे तो त्रास त्याचा त्यालाही होई. त्यावेळी त्यावर मग कोणाचाच काहीही ईलाज चालत नसे आणि इतर वेळी काही ईलाज करून घ्यावा अशी आवश्यकता अनयाला मुळीच जाणवत नसे. मुळात तो एक सामान्य मनुष्य होता आणि त्याचे जीवनही अगदी सामान्य होते. आपल्या आईविषयीचे व पत्नी राधेविषयीचे कर्तव्यकर्म तो त्याला जमेल तसे व तेवढे अगदी प्रामाणिकपणे करीत होता. अर्थात त्याची राधेकडूनही पत्नीच्या कर्तव्याची अपेक्षा होती. राधा ते सर्व योग्य प्रकारे करीतही होती. परंतु तरीही राधेचे मन मात्र कृष्णाच्या प्रेमात गुंतलेले आहे हे कळल्यावर मात्र अनयाची प्रतिक्रिया साहजिकच एखाद्या सामान्य नवऱ्याप्रमाणेच झाली. आधी त्याने राधेला समजावून सांगितले. पण तरीही राधेचे कृष्णप्रेम कमी न होता वाढतच आहे हे पाहिल्यावर अनय बिथरलाच. त्याने हर प्रयत्नाने राधेला कृष्णापासून परावृत्त करण्यासाठी तिला त्रास तर दिलाच पण तिचा मानसिक छळ करण्यासही कमी केले नाही. अनयाच्या मनात असलेल्या वासनेने दूषित झालेल्या दृष्टीमुळेच हे सर्व घडत होते. म्हणून त्याच्या वागण्याचा त्यालाही मानसिक त्रास होतच होता. या सर्वाला कृष्णच जबाबदार आहे आणि तोच राधेला जाणुन बुजून त्याच्या नादी लावत आहे अशा खात्रीने अनयाने तर कृष्णाचा द्वेष, मत्सर व राग करावयास सुरुवात केली होती.

हे नारदा, पण अनयाला कृष्णाने जेव्हा अक्षरशः मृत्यूच्या दाढेतून खेचून आणले आणि त्याचे प्राण वाचविले, तेव्हापासून अनयात झालेला बदल मात्र अत्यंत कौतुकास्पदच आहे. कृष्णाच्या खऱ्या प्रेमाचा आलेला अनुभव त्याने आपल्या मनात अगदी घट्ट धरून ठेवला आणि सुरुवातीला कृतज्ञ भावानेही असेल, पण त्याने कृष्णाचा सहवास करायला सुरुवात केली. कृष्णसहवासात अनुभवलेल्या प्रेमाने अनयाच्या मनातील कृष्णाविषयीच्या सर्व शंका कुशंका दूर झाल्या आणि त्याचे मन शुद्ध झाले. कृष्णप्रेमाची अनयालाही गोडीच लागली आणि त्याचे सत्यत्वही त्याने पूर्णपणे ओळखले. त्याचीच परिणती म्हणजे कृष्णप्रेमाने सदैव युक्त असलेल्या राधेविषयी अनयाला अत्यंत कौतुक व थोडासा आदरही वाटू लागला. पण कृष्णाचे जे ईश्वरी माहात्म्य होते त्याविषयी कृष्णही काही अनयाशी बोलला नाही आणि अनयानेही कधी कृष्णाला त्या संबंधी काही विचारले नाही. त्यामुळे प्रत्यक्ष कृष्णाची भक्ति अशी अनयाकडून काही कधी घडलीच नाही.

हे नारदा, कृष्ण मथुरेला गेल्यानंतर अनयालाही अत्यंत वाईट वाटलेच. परंतु कृष्णप्रेमाच्या स्मृती त्याने आपल्या मनात ज्या धरून ठेवल्या होत्या, त्यातच तो रमलेला होता आणि आपले जीवन सुखासमाधानाने जगत होता. राधेचे माहात्म्य जाणवण्यासाठी अनयाला त्याचे राधेशी असलेले पतीचे नाते हेच आड आले असणार. त्यामुळेच अनय राधेकडे कृष्णप्रेमाचा अनुभव घेण्याच्या दृष्टीने पाहू शकलाच नाही. राधेकडे तो कृष्णासंबंधी मुद्दाम विषय काढून काही बोलणे वा

विचारणे असे करीतच नव्हता. अनयाला त्याची आवश्यकता व जरुरी वाटतच नव्हती. ‘तू तुझ्या ठिकाणच्या कृष्णप्रेमाचा अनुभव घे आणि मी माझ्या ठिकाणच्या कृष्णप्रेमाचा अनुभव घेईन’ याच वृत्तीने व धोरणाने अनयाचे राधेशी वागणे घडत होते. कृष्णजयंतीच्या सोहळ्यात मात्र अनयाने अगदी मनःपूर्वक, उत्साहाने व सक्रिय सहभाग घेतला. परंतु कृष्णाविषयीची कृतज्ञता व प्रेम व्यक्त केल्यानंतर ‘हे कृष्णप्रेम आता ज्याने त्याने स्वतःच अनुभवायचे आहे. त्यासाठी कोणीही कोणावर अवलंबून राहण्याची आवश्यकता तर नाहीच, उलट ते अयोग्यच ठरेल’ असे जे विचार अनयाने व्यक्त केले त्यावरूनच त्याच्या मनाची वृत्ती व कल अगदी स्पष्ट झाला. अशा तऱ्हेने अनयाचे मन कृष्णप्रेमाच्या अनुभवामुळे जरी कृष्णाविषयीच्या शंकेतून मुक्त झाले, तरी कृष्णाचे ईश्वरी माहात्म्य जाणत नसल्यामुळे त्याच्याकडून प्रत्यक्ष कृष्णाची अशी भक्ति घडलीच नाही. त्यामुळे त्याची मूळची सांसारिक दृष्टी कायमच राहिली असणार आणि त्याच वृत्तीने त्याने पुढील जीवन सुखशांतीने जगले असणार याची मला अगदी खात्री वाटते.



हे नारदा, या पार्श्वभूमीवर राधेचा भक्तिभाव आणि तिने कृष्णाशी अनुभवलेले ऐक्यत्व याला दुसऱ्या कशाचीही सर येणे शक्यच नाही. कोणाशी तुलना न करताही राधेचे श्रेष्ठत्व सहजच लक्षात येते. त्याला दुसऱ्या कशाचीही तोड नाही. अर्थात हे श्रेष्ठत्व मुळात सगुण भक्तिभावाचेच आहे हे मी जाणून आहे. पण तरीही तो भक्तिभाव राधेच्या रूपाने पूर्णपणे साकार झाला आणि कृष्णाचे सगुण प्रेम व ईश्वरी माहात्म्य यांचा अपूर्व संयोग राधेच्या ठिकाणी झाला हे मान्य करावेच लागेल. मग इतर कोणी राधेला मान्यता देवोत, वा न देवोत.’’

*****

# जय राधाकृष्ण

**ल**क्ष्मीच्या बोलण्याने संतुष्ट होऊन नारदाने मान डोलवली आणि तो म्हणाला, ''हे लक्ष्मी, तुझ्या विचारांची दिशाही योग्य आहे आणि त्या विचारांच्या मंथनातून तू काढलेला निष्कर्षही योग्यच आहे. तू म्हटल्याप्रमाणे राधेच्या भक्तिभावासाठी दुसऱ्या कोणाच्याही मान्यतेची आवश्यकता नव्हतीच. कारण ते कृष्णाला मान्य होते हे महत्त्वाचे. राधेसाठी तर कृष्णाची प्रसन्नता हेच तिच्या भावाचे मूळ होते आणि हेच तिच्या भावाचे फळ होते. परंतु लक्ष्मी, तुला एक अतिशय आनंदाची गोष्ट सांगतो की राधेचा हा सगुण भक्तिचा भाव जगाच्या इतिहासात अजरामर होऊन राहिला. 'राधा, राधाकृष्ण, राधा' हे तर जणू सगुण प्रेमभक्तिचे मुख्य सूत्रच ठरले. सुरुवातीची कृष्णापासून वेगळी असलेली 'राधा', मग प्रत्यक्ष कृष्णाशी प्रेमभक्तिभावाने ऐक्य पावलेली राधा म्हणजे 'राधाकृष्ण' आणि नंतर अंतःकरणात कृष्णस्वरूप होऊन राहिलेली, पण तरीही बाह्यांगाने कृष्णापासून वेगळी राहिलेली अशी 'राधा'. प्रेम, भक्ति व ऐक्याचा आनंद अशा तीनही अवस्थांचा निर्देश करणारे असे हे सूत्र प्रेमीभक्तांसाठी एक मंत्रच ठरले.

पुढे पुढे ज्यांना ज्यांना ईश्वराचे सगुण प्रेम अनुभवण्याची संधी भाग्याने मिळाली त्यांच्यासाठी राधेचा भक्तिभाव हाच आदर्श होऊन राहिला. आपल्या ठिकाणची प्रेमाची आर्तता व व्याकुळता व्यक्त करायची असो किंवा भक्तिची गोडी व आनंद याचा अनुभव वर्णन करायचा असो, अनेक भगवद्भक्तांनी व महात्म्यांनी या राधाकृष्ण चरित्राचेच माध्यम स्वीकारले अणि सगुण प्रेमभक्तिने ते नेहमी अधिकाधिक रंगवत ठेवले. त्यामुळे राधा व कृष्ण हे सगुण प्रेमभक्तिने घडणाऱ्या देव व भक्त यांच्या ऐक्याचे प्रतीकच ठरले. ईश्वराचे सगुण प्रेमरूप असा देव म्हणजे कृष्ण आणि सगुण भक्तिभावाने ईश्वराशी ऐक्य पावलेली भक्त म्हणजे राधा, असे राधा व कृष्ण हे देव व भक्त यांच्या ऐक्यतेचे रूपकच ठरले. म्हणून राधा व कृष्ण असा नावाचा उल्लेख सुद्धा वेगळा वेगळा न करता सर्व भक्तांनी नेहमी **'राधाकृष्ण'** असाच उल्लेख, त्या भक्तांच्या ठिकाणी झालेल्या भक्तिभावाच्या ऐक्यतेच्या अनुभवातून केला. भगवद्भक्तांच्या मुखातून केव्हाही 'कृष्ण' एवढेच नाव कधी बाहेर आले नाही, तर प्रेमभावाने दाटून आलेल्या त्यांच्या अंतःकरणातून भक्तिभावापोटी, कंठी व ओठी सदैव 'जय राधाकृष्ण, जय राधाकृष्ण, जय राधाकृष्ण' याच नामाचा गजर स्फुरत राहिला.

'राधाकृष्ण' याच नामाचा नाद भगवद्भक्तांच्या ठिकाणी नित्य घुमत राहिला आणि तोच नाद त्यांनी सदैव घुमवत ठेवला. त्या नादाचे अनेक निनाद निर्माण झाले. त्या निनादातून पुन्हा अनेकांच्या ठिकाणी ईश्वराच्या सगुण प्रेमाचा नाद निर्माण झाला आणि ते प्रेमनादी झाले. तीच त्यांच्या ठिकाणच्या भक्तिभावाची नांदी ठरली. पुढे प्रत्यक्ष सगुण भक्तिने त्यांचे सर्व जीवनच आनंदी झाले, कारण ईश्वराच्या स्वानुभवाने ते स्वानंदी झालेले होते. मानव देहाने असेपर्यंत या स्वानंदी भगवद्भक्तांनी सगुण प्रेमभक्तिच्या आनंदाची लयलूट केली आणि देहत्यागानंतर परमात्म्याच्या परमानंदी स्वरूपात ते भक्त अगदी सहजपणे व अलगदपणे विलीन झाले.''

*****

## त्रिवेणी संगम

**प**राकोटीच्या भावपूर्ण अवस्थेतील परमोच्च आनंद असा जो परमानंद, त्यामध्ये पूर्णपणे बुडून गेलेल्या नारदाच्या मुखातूनही **'जय राधाकृष्ण, जय राधाकृष्ण'** हेच शब्द कितीतरी वेळ हळुवारपणे पण स्पष्टपणे बाहेर येत होते. लक्ष्मीची अवस्थासुद्धा त्यापेक्षा वेगळी राहिलीच नव्हती. मिटलेल्या नेत्रातून प्रेमभक्तिभावाच्या जलधारा वाहणाऱ्या लक्ष्मीच्या मुखातूनही **'जय राधाकृष्ण, जय राधाकृष्ण'** हेच शब्द बाहेर येत होते. नारदाची व लक्ष्मीची ती अत्यंत भावपूर्ण अवस्था पाहून, भक्तप्रेमाने नित्य भरलेले नारायणाचेही अंतःकरण वाहू लागले. आपल्या आसनावरून उठून नारायण धावतच नारदाच्या जवळ गेला आणि त्याने नारदाला प्रेमभरे दृढालिंगन दिले. नारायणाच्या प्रेमस्पर्शाने नारद थोडासा देहभानावर आला आणि नारायणाला पहाताच त्याने नारायणाच्या चरणांवर आपले मस्तक ठेवले. नारायणाने नारदाला उचलून आपल्या शेजारी आसनावर बसवले. त्या नंतर नारायणाने लक्ष्मीच्या जवळ जाऊन तिला प्रेमाचे दृढालिंगन दिले. देहभानावर आलेल्या लक्ष्मीलाही नारायणाने आपल्या शेजारी दुसऱ्या बाजूला आसनावर बसवले. एका बाजूला आपला प्रिय भक्त नारद, एका बाजूला आपली प्रिय अर्धांगिनी लक्ष्मी आणि त्यांच्यामध्ये बसलेला नारायण म्हणजे प्रेम, भक्ति व आनंद यांचा त्रिवेणी संगमच होता. हे दृश्य साऱ्या विश्वातील एक अतिशय रमणीय, विलोभनीय व संस्मरणीय असे दृश्य होते. ते अलौकिक दृश्य पाहण्याचा परमानंद ज्यांना अनुभवता आला ते खरेच परमभाग्यवंत होत. त्यांनाच खरा भगवंत भेटला हे मात्र निश्चित!

**''भक्ता भेटला भगवंत,**

**भक्त झाले भाग्यवंत''**

# लेखक परिचय - श्रीपरमानंदस्वामी



श्रीपरमानंदस्वामी - श्री.अविनाश मोरेश्वर लिमये यांनी मुंबई विद्यापीठातून M.Sc. with Research ही पदवी घेतली. आय.आय.टी. पवई, मुंबई या सुप्रसिद्ध संस्थेत मेटॅलर्जिकल इंजिनिअरिंग या विभागात ते दीर्घकाळ सेवा करून निवृत्त झाले आहेत.

गृहस्थाश्रमात राहूनच भक्तिमार्ग कसा साधता येतो व सद्‌गुरु कृपेने ईश्वरप्राप्ती कशी करून घेता येते याचा आदर्श त्यांच्या जीवनाद्वारे प्रत्यक्ष साकार झालेला आहे.

त्यांनी प्रदीर्घ काळ, अखंडपणे व प्रेमभावाने त्यांचे पूज्य पिता व सद्‌गुरु श्रीअवधूतस्वामी यांची सेवा, भक्ती व त्यांचे कार्य करून तसेच स्वतःची साधना करून सर्वश्रेष्ठ असा आत्मानुभव घेतला.

श्रीअवधूतस्वामी यांच्या महानिर्याणानंतर श्रीपरमानंदस्वामी यांनी तरुण वयातच या दत्तपरंपरेच्या कार्याची धुरा अत्यंत समर्थपणे सांभाळली आणि सर्वसामान्यांना व भक्तांना अचूक मार्गदर्शन केले व आजही करीत आहेत.

श्रीपरमानंदस्वामी यांनी लिहिलेला प्रभूरामाच्या अंतःकरणाच्या अवस्थेचे दर्शन घडविणारा अनुभवसिद्ध ग्रंथ ‘हा राम माझा’ २००० साली व कृष्ण व राधा यांच्या भक्तिऐक्याचे स्वानुभूतीतून मनोहारी दर्शन घडविणारा ग्रंथ ‘कृष्ण सखा माझा’ २००४ साली प्रकाशित झाला. तसेच नारद व लक्ष्मी यांच्या संवादातून उलगडलेले कृष्णाच्या अंतरंगातील गूज प्रकटविणारा ग्रंथ ‘कृष्ण परमात्मा’ २००८ मध्ये प्रकाशित झाला. या ग्रंथास मराठी साहित्य परिषद, पुणे यांचा ‘मृत्युंजय’ पुरस्कार प्राप्त झाला आहे. तसेच दत्तात्रेयांच्या अवतार मालिकेतील चरित्रांचे रहस्य प्रकट करणारा ग्रंथ ‘दत्त हाचि अवधूत’ २०१० साली प्रकाशित झाला असून, श्रीपरमानंदस्वामी यांच्या भक्तिकाव्यांचा संग्रह ‘आनंदाचे डोही’ २०११ मध्ये प्रकाशित झाला आहे. ‘दत्तात्रेय वामन भिडे - एक शोध आनंदाचा’ ही आध्यात्मिक कादंबरी २०१४ साली प्रकाशित झाली, तर त्याच आध्यात्मिक कादंबरीचा पुढील भाग म्हणजे ‘दत्तात्रेय वामन भिडे - एक प्रवास आनंदाचा’ हा २०१५ मध्ये प्रकाशित झाला आहे. त्यापुढील भागाचे लेखन श्रीपरमानंदस्वामी यांचेकडून घडतच आहे.

# ई साहित्य प्रतिष्ठान

ई साहित्य प्रतिष्ठान आपल्या वाचकांसाठी कृष्णसखा माझा या सुंदर पुस्तकाचे पाच भाग आणत आहे. सौ. प्रतिमा प्रविण आठवले यांच्या अथक परिश्रमांतून हे साकार होत आहे. त्यातला हा नारळीपौर्णिमेला आलेला चवथा भाग. हा तुम्हाला कसा वाटला ते सांगा. पाचवा भाग कृष्णाष्टमी ला प्रसिद्ध होईल. याच दरम्यान महाभारत (मूळ “जय” हा ग्रंथ) येत आहे.

२०१६ हे वर्ष ई साहित्यासाठी फ़ारच उत्साहाने सुरू झाले. या वर्षाची सुरुवातच मुळी लिओ टॉलस्टॉय, पॉल ब्रन्टन, आणि मनुस्मृतीने झाली. धर्माकडे पहाण्याचे तीन विविध दृष्टीकोन यांत आहेत. २०१५ मध्ये ई साहित्य मधून संत ज्ञानेश्वर, संत तुकाराम, संत नामदेव, संत बहिणावाई, संत कान्होपात्रा, संत चोखामेळा, गीतारहस्य, भगवद्‌गीता, अशा अनेक मौल्यवान ग्रंथांची ई निर्मिती करण्याचा योग आला. २०१६ ची सुरुवात बायबल, मनुस्मृती पासून झाली आणि त्यात कुराण, बौद्धमत, जैनधर्म, ज्यू, पारशी, वेद, उपनिषदे अशा विविध धर्मशास्त्रांची भर पडावी असा योग दिसतो आहे. योग दिसतो असे यासाठी म्हणतो की ही पुस्तके गेल्यावर्षीही आम्ही कुठे मुद्दाम शोधायला गेलो नव्हतो. श्री विजय पांढरे, डॉ. श्री अशोक धांडे, श्री अविनाश नगरकर, श्री अरुण फ़डके, श्री रत्नाकर महाजन, श्री फ़्रान्सिस आल्मेडा, श्री मधुकर सोनावणे, श्री अशोक कोठारे, श्री अरुण काकतकर या व इतर अनेक विद्वानांनी हे साहित्य मोठ्या विश्वासाने आमच्या हाती सोपवलं. आणि आम्ही फ़क्त पोस्टमनगिरी केली. आमच्या सुदैवाने प्रचंड मोठ्या वाचकवर्गाने या साहित्याचा आस्वाद घेतला. या महानुभावांच्या श्रमाचे काही प्रमाणात चीज झाले.

ई साहित्य प्रतिष्ठान निर्माण झाले नवीन साहित्यिकांसाठी एक व्यासपीठ म्हणून. ते तसेच आहे. आणि तसेच राहील. साधारण ८० टक्के पुस्तकं ही नवसाहित्यिकांचीच असतील. पण सुमारे वीस टक्के पुस्तकं नावाजलेली, वाचकप्रियही असावीत. म्हणजे वाचकांचा ओघ वाढता आणि वाहता रहातो.

मराठीतल्या महान प्रकाशकांच्या तुलनेत ई साहित्य अगदीच नगण्य आहे. आणि त्यांच्याशी तुलना वा स्पर्धा करण्याचा मानसही नाही. परंतू दर्जाच्या बाबतीत मात्र आम्ही तोडीस तोड राहू. हे वर्ष अत्यंत दर्जेदार कथा, कादंबऱ्या आणि काव्य-विनोद-शास्त्र पुस्तकांचे असेल याची आम्ही ग्वाही देतो.

आपण या साहित्य यज्ञात यथाशक्ती इंधन पुरवावे ही विनंती. आपल्या ओळखीच्या दहा किंवा अधिक मराठी साक्षरांचे ई मेल पत्ते आमच्याकडे पाठवा. आम्ही तुम्हाला आमचे VIP सभासद करू. याशिवाय या कामात इतर अनेक तऱ्हांनी आपण सहभागी होऊ शकता. वेबसाईटला भेट तर देतच रहा. खंबीरपणे पाठीशी उभे रहा. मग बघाच काय काय चमत्कार घडतील ते.

आपले विश्वासू

टीम ई साहित्य

